# महाराष्ट्रातील साप









सर्पअभ्यासक :- राहुल शिंदे




## मनोगत

या पुस्तकामध्ये महाराष्ट्रातील सापांविषयी माहिती दिली आहे.याचा मुख्य उद्देश म्हणजे आपणा सर्वांपर्यंत सापांची माहिती पुरवणे.काही अंधश्रद्धा व त्याच्यामागील शास्त्रीय कारणेही दिली आहेत.साप कसा ओळखावा , साप घरात आल्यास काय करावे,सर्पदंश झाल्यास काय करावे आणि काय करू नये ,अंधश्रद्धा व त्याचे निरसन अश्या बऱ्याच गोष्टी या पुस्तकात सोप्या भाषेत सांगीतल्या आहेत.बिनविषारी सापाला हिरवी,निमविषारी सापाला पिवळा आणि विषारी सापाला लाल रंगाच्या स्मायली ने दर्शविले आहे. हे पुस्तक सर्वसामान्याबरोबरच डॉक्टर व सर्पमित्रांना देखील महत्त्वाचे आहे.आपण या पुस्तकातील मुबलक छायाचित्रांमूळे याचा **FIELD GUIDE** म्हणून उपयोग करू शकतो.

अज्ञाना पोटी सापांबद्दल माणसाच्या मनात अंधश्रद्धा व भय पसरले आहे.हे भय व अंधश्रद्धा दूर करण्यासाठी व सापांचे महत्व पटवून देण्यासाठी केलेला हा एक प्रयत्न. तर चला सुरु करूया सर्प जगताची सैर आणि जाणून घेऊया सापांना एका वेगळ्या दृष्टीकोनातून.



***सर्पअभ्यासक श्री. राहुल शिंदे***



प्रतिज्ञा
मी निसर्ग प्रेमी आहे.
या विश्वातील सर्पसृष्टीचा मला
अभिमान आहे. मानव जातीवर साप
करत असलेल्या उपकारांची मला जाणिव
आहे. म्हणून मी अशी शपथ घेतो की,
मी कधिही सापांना मारणार नाही तसेच
कोणालाही मारु देणार
नाही.

# अनुक्रमाणिका

# ❑ सापांची उत्क्रांती :-




सापांचे अस्तित्व सुमारे १५ कोटी वर्षांआधी पासून असल्याचे जीवाश्म अभ्यासातून समोर आले आहे. साप जरी सरपटणारा प्राणी असला तरी, काही वर्षापूर्वी त्यांनाही पाली प्रमाणे पाय होते पण बिळातून वावरताना त्यांना पायांचा अडथळा होत असल्याने ते पायांचा वापर खूपच कमी करू लागले व कालांतराने त्यांचे पाय नाहीसे झाले. अजगर सापामध्ये पायांचे अवशेष आजही दिसून येतात.

सापांचे अस्तीत्व मानवाच्या आधी पासून असल्याने आपल्या ७/१२ चे खरे हक्कदार साप आहेत असे म्हणने वावगे ठरणार नाही. म्हणून साप आपल्या घरात येतो असे म्हणण्यापेक्षा आपण सापांच्या घरावर अतिक्रमण करून राहतो अस म्हणणं योग्य ठरेल.

# सापाचे तीन प्रकार आहेत

हे पाहा आमचे प्रकार



**बिनविषारी**



**निमविषारी**



**विषारी**



**1) बिनविषारी:-** या प्रकारच्या सापांमध्ये बिलकुल विष नसतं. विषारी सापांपेक्षा बिनविषारी सापांची संख्या खूपच जास्त आहे.

उदा:-धामण,कवड्या,तस्कर,गवत्या,धूळनागीण इत्यादी.

**2) निमविषारी:-** हे साप विषारी असले तरी माणसास धोका नसतो. विषाची तीव्रता कमी असल्यामुळे याचं विष माणसासाठी जीवघेणे नाही. याच्या दंशामुळे चक्कर येणे,मळमळ,डोके दुखी इत्यादी लक्षणं दिसतात.

उदा:-मांजऱ्या,रेती सर्प,हरणटोळ इत्यादी.

**3) विषारी:-** या सापाचा दंश धोकादायक असतो. याच्या दंशा मुळे वेळीच उपचार न झाल्यास जीव जाण्याची शक्यता असते. याच्याबद्दल पुस्तकात पुढे भरपूर माहिती दिली आहे. उदा:- नाग,मण्यार,घोणस.फुरसे इत्यादी.

# सापांबद्दल काही रोचक तथ्ये

- साप थंड रक्ताचा प्राणी असून ४ डिग्री पेक्षा कमी व ४५ डिग्री पेक्षा जास्त तापमान सापांना सहन होत नाही.
- साप अनेक दिवस अन्नाशिवाय राहू शकतात.भारतीय अजगर 2 वर्ष 9 महिने काहीही न खाता जागल्याची नोंद आहे.
- जगातील सर्वात विषारी साप बेल्चर समुद्र सर्प असून त्याचे विष Black Mamba पेक्षा विषारी आहे.
- मण्यार हा साप आशिया खंडातील सर्वात विषारी साप असून त्याचे विष नागाच्या विषाच्या कित्येक पटीने जहाल असते.
- हरणटोळ हा भारतातील एकमेव आडवी बाहुली असलेला साप आहे.
- सापाच्या शरीरा मध्ये ७०% पाणी असते.
- सर्वात जास्त सर्पदंश सप्टेंबर महिन्यात होत असल्याचे आढळून आले आहे.
- कोलुब्रिडी हे सर्पजगतातील सर्वात मोठे कुळ असून जगातील ६०% सापांचा यामध्ये समावेश आहे.
- व्हायपरिडी कुळ हे सापाचे सर्वात विकसित कुळ आहे.
- सापाची दृष्टी कमजोर असून त्याला द्विमितीय प्रतिमा दिसते.पण हरणटोळ सापाचे डोळे इतर सापाच्या तुलनेत जास्त विकसित झाले असून उजवीकडे व डावीकडे असा डोलून समोर असलेल्या वस्तूची त्रिमितीय प्रतिमा तयार करतो.
- भारतात सापडणाऱ्या विषारी सापांपैकी घोणस सापाचे विषदंत सर्वात मोठे असतात.
- काही साप अंडी देतात तर काही पिल्ले.अंड्यातून पिल्ले बाहेर येण्यासाठी ४० ते १०० दिवस लागतात तर जारज सापांना पिल्ले देण्यासाठी 3 ते 6 महिने लागतात.

# प्रतिसर्पविष Anti snake Venom *(ASV)*




सापाचे विष उतरविण्या संबंधी अनेक पोकळ दावे-प्रतिदावे केले जातात जसे की जडीबुटी, झाडपाला,मंत्र-तंत्र इत्यादी. आजकाल सोशल मेडियावर फिरत असलेल्या **Naja 200** या पोस्टने तर धुमाकूळ घातला असून त्यात **Naja 200** हे औषध सर्पदंशावर प्रभावी असल्याचा पोकळ दावा केला आहे जो पूर्णपणे खोटा आहे. सर्पदंशावर एकमेव प्रभावी औषध म्हणजे सापाच्या विषा पासूनच तयार केलेले प्रतीसर्पविष . हे प्रतिविष तयार करण्यासाठी पृष्ठवंशीय प्राण्यांच्या प्रतिपिंडांचा **(Antibodies)** उपयोग करतात . यासाठी पाळीव प्राण्यांचा उपयोग केला जातो. प्रतिविष बनविण्यासाठी साधारणतःघोडा वापरला जातो.इतरही प्राणी जसे शेळी, मेंडी, खेचर,गाढव इत्यादी वापरले जातात.पण घोड्यात रोग प्रतीकार शक्ती इतर प्राण्यांपेक्षा जास्त असते.त्यामुळेच पहिली पसंती घोड्याला दिलेली आहे. ***अल्बर्ट कॅलमेट*** या फ्रेंच शास्त्रज्ञाने १८९५साली प्रतीसर्पविषाचा शोध लावला. सर्वात आधी भारतीय नागाचे प्रतिविष बनवले गेले. सर्वप्रथम ज्या विषासाठी प्रतिविष बनवायचे असते ते विष जमा करतात. त्यासाठी त्या सापाच्या प्रजातीला पकडतात. त्यानंतर त्याचे विष जमा केले जाते. हे विष अत्यंत कमी प्रमाणात इंजेक्शनमार्फत घोड्यामध्ये सोडले जाते. त्यादरम्यान त्या घोड्याला आणखी इंजेक्शन दिले जाते ज्याने त्याची रोग प्रतिकारशक्ती वाढते.

# प्रतिसर्पविष Anti snake Venom (ASV)

यामुळे जास्त प्रमाणात प्रतिपिंडे **(Antibodies)** तयार होतात.या प्रक्रियेला जवळपास 6 महिने लागतात.आता घोड्याच्या शरीरात प्रतिपिंडे **(Antibodies)** तयार झालेली असतात. प्रत्येक प्राण्यांमध्ये ही क्षमता थोड्या फार प्रमाणात असते. (माणसांमध्येसुद्धा काही विषारी प्राण्यांच्या विषासाठी प्रतिपिंडे तयार होतात. पण काही प्रजातींसाठी प्रतिपिंडे मानवी शरीरात तयार होत नाही म्हणून इतर पाळीव प्राण्यांची मदत घ्यावी लागते). आता घोड्याच्या शरीरात प्रतिपिंडे तयार झाल्यावर त्याचे रक्त गोळा केला जाते. त्या रक्तातील प्रतिपिंडे हे अपकेंद्रित्राने **(Centrifuge)** वेगळे केले जाते. हे प्रतिपिंडे गोधून ठेवले जाते ज्यामुळे त्यांचा वापर बऱ्याच काळासाठी केला जाऊ शकतो.**नाग,मण्यार, घोणस व फुरसे** या चार विषारी सापांना इंग्रजी मध्ये **बिग फोर** असे म्हणतात. या 4 सापांचे विष एकत्र करून प्रतीसर्पविष ही लस तयार केली जाते.












# सापांचे महत्व
# Importance of Snakes

साप आपला शत्रू नसून मित्र आहे, हे प्रत्येकाच्या मनात रुजणे  गरजेचे आहे. साप हा अन्नसाखळीतील प्रमुख घटक आहे.विज्ञान सांगते की, सापांचे अस्तित्व १५ कोटी वर्षांपूर्वी म्हणजेच माणसाच्या उत्पत्तीच्या आधी पासून आहे.सापांपासून मानवास अनेक फायदे आहेत.जितके आपण सापाला घाबरतो, त्याहून अधिक साप आपल्याला घाबरत असतो. तो स्वतःहून कधीही दंश करत नाही. जेव्हा आपल्यापासून त्याला काही धोका वाटतो तेव्हाच तो दंश करतो.शहरीकरणामुळे सापांची संख्या झपाट्याने कमी होत चालली आहे.यामुळे बऱ्याच सापांच्या प्रजाती लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत.जर सापांची संख्या कमी झाली,तर अन्नसाखळी विस्कळीत होईल व त्याचे घातक परिणाम पर्यावरणावर होतील.भारतात सुमारे ३०% पिकांची नासाडी उंदीर करतात.आणि या उंदरांना खाण्याचं काम साप करतो. माझ्या मते साप जर पृथ्वीवरून नष्ट झाले तर माणूस या पृथ्वीतलावर जास्तीत जास्त 5 वर्ष जगेल.उंदरांच्या अनियंत्रीत संखेमुळे मानवाला अन्नाच्या कणा कणा साठी मोठी कसरत करावी  लागेल



# सापांचे महत्व
# Importance of Snakes

## ❑ सापांपासुन होणारे फायदे :-

1. साप उपद्रवी उंदरांवर व घुशीवर नियंत्रण ठेवतो.
2. सापांच्या विषाचा उपयोग औषधे बनवण्यासाठी केला जातो. उदा. Cancer, Heart Attack, Blood Pressure, Anesthesia, Pain Killer, Etc.
3. काही साप पाण्यावरील डासांची अंडी खाऊन Dengue, Maleria इ.रोगांपासून आपले संरक्षण करतात.
4. जर विषारी साप चावला तर त्याच प्रकारच्या विषारी सापांपासून प्रतिविष तयार करावे लागते.
5. बरेचसे कीटक व अळया पिकांची नासाडी करतात.त्यांना खाण्याचे काम साप करतो व त्या किडे व अळयावर नियंत्रण ठेवतो.
6. काही जमीन पोखरणारे साप जसे की खापरखवल्या, मांडूळ,वाळा इत्यादी जमीन भुसभुशीत करतात जी शेती साठी अत्यंत उपयुक असते.

## ❑ उंदरांपासून होणारी नासाडी :-



❑ एका साप (जीवनकाळात) सुमारे सव्वा पाच ते साडे पाच लाख उंदरांवर नियंत्रण ठेवतो.

एका उंदराची जोडी वर्षाला सरासरी 850 पिल्लांना जन्म देते.एक साप एका आठवडय़ाला 2 उंदीर म्हणजे

एक जोडी एका वर्षाला (850×52 आठवडे) सरासरी = 44,200 उंदीर..

एक साप सरासरी 12 वर्षे जगल्यास 44,200(सरासरी) ×12 = 5,30,400 इतक्या उंदरांवर नियंत्रण ठेवतो.(**सव्वा 5 लाखाहून जास्त** )

## ❑ सापांची संख्या कमी होण्यामागची कारणे :-

1. मनुष्य जंगलावर करत असलेले अतिक्रमण आणि जंगलतोड.
2. महामार्गाची आणि वाहनाची संख्या वाढल्याने दरवर्षी फक्त महाराष्ट्रातच 5 लाखा पेक्षा अधिक साप रस्त्यावर मृत्युमुखी पडतात.
3. मानवी वस्ती मध्ये आलेल्या सापांची भीती व अंधश्रध्दे पोटी होणारी हत्या.
4. प्रदूषणामुळे वातावरणात व पाण्यात होणारे बदल.
5. सापांची अंधश्रध्देतून होणारी तस्करी व हत्या.
6. कीटकनाशकांमूळे सुध्दा सापांची संख्या कमी होत चालली आहे..

# दोन तोंडांचा साप







हा दोन तोंडांचा साप म्हणजे नेमकं काय?



# दोन तोंडांचा साप

पुरातन काळापासून आपण सापांना अनेक तोंडे असल्याचे ऐकले आहे,उदा:- पाच तोंडांचा(फण्यांचा) भुजंग नाग, कालिया नाग.पण इतक्या तोंडांचा साप आजतागायत सापडल्याची नोंद नाही आणि नैसर्गिकरीत्या ते शक्यही नाही.

आजही आपल्याला हे वाक्य नक्की ऐकायला मिळतं, “दोन्ही तोंडाने बोलू नकोस मांडूळा सारखं”.

आपल्या मनात दोन तोंडांचा साप म्हणजे ‘**मांडूळ**’ अशी एक धारणा काही गैरसमजुतीतून पसरली आहे.**मांडूळ** या सापाला एकच तोंड असतं.मात्र त्याची शेपूट आखूड असल्याने हुबेहूब तोंडासारखी दिसते आणि यामुळेच आपण शेपटीलाही तोंड समजतो आणि दोन्ही बाजूस याला तोंडं असल्याचा गैरसमज होतो.ह्या वरून आपणास लक्षात आले असेल कि **मांडूळ** सापाला एकच तोंड असतं.

हे झालं मांडूळ सापाबद्दल.पण खरच दोन तोंडांचा साप असू शकतो का तर हो,दोन तोंडांचा साप असतो पण अश्या सापांना एकाच बाजूला दोन तोंडं असतात.हि सापाची वेगळी प्रजात नसून कोणत्याही सापाच्या प्रजातीमध्ये दोन तोंडं आढळू शकतात.काही अनुवंशिक बदलांमुळे असे साप जन्माला येतात.अशी उदाहरणे माणसांमध्ये सुद्धा आढळतात.



# दोन तोंडांचा साप

शरीर एक आणि तोंडं दोन असल्यामुळे अश्या सापांचे दोन्ही मेंदू कार्यरत असतात आणि शिकार करताना,भक्ष खाताना,पाणी पिताना त्यांच्यात स्पर्धा लागते.या गोष्टी सतत घडत असल्याने त्यांच्यात वारंवार स्पर्धा लागून त्याच्यातच त्या सापाचा जीव जातो म्हणून असे साप निसर्गात जास्त दिवस जगू शकत नाहीत.

**नाग,घोणस,तस्कर,डुरक्या घोणस,कवड्या** इत्यादी प्रजातीच्या सापांमध्ये दोन तोंडे असल्याचे अनेक उदाहरण भारतात किंबहुना महाराष्ट्रातही सापडल्याचे पहावयास मिळते.

फोटोच्या स्लाईड मध्ये दाखवलेले पहिले चित्र **मांडूळ** सापाचे असून त्यात डाव्या बाजूला त्याचे तोंड व उजव्या बाजूला त्याची शेपूट आहे पण दोन्हीही सारखेच दिसतात.दुसऱ्या चित्रात दाखवलेला साप **तस्कर** असून त्याला एकाच बाजूला दोन तोंडं आहेत.



# रंगहीन साप (ALBINO SNAKE)




अर्ध रंगहीन



रंगहीन/पूर्ण रंगहीन








# रंगहीन साप (ALBINO SNAKE)

सापाचा रंग हा त्वचेतील मेलानीन या घटकावर अवलंबून असतो.त्वचेतील मेलानीन जितकं जास्त तितका सापाचा रंग गडद दिसतो.रंगहीन **(Albino)** सापामध्ये मेलानीन हा घटक खूपच कमी प्रमाणात असतो त्यामुळे या सापांचा रंग फिकट दिसतो.डोळे आणि जीभ लाल किंवा गुलाबी रांगाची असते. सापाच्या मूळ रंगा जागी पांढरा पिवळसर रंग येतो आणि अश्या वेळेस साप कोणत्या प्रजातीचा आहे हे ओळखणे कठीण होते. रंगहीनता **(Albinism)** हा एक प्रकार चा रंग दोष असून कोणत्याही सापामध्ये हा होऊ शकतो. रंगहीनता **(Albinism)** अनुवांशिक सुद्धा असू शकते. इतर सापांच्या तुलनेत रंगहीन सापांचे आयुष्यमान कमी असते कारण या सापांना जास्त थंडी व उन्हाचा खूप त्रास होतो.याचा त्यांच्या जीवनमानावर दुष्परिणाम होतो व हे साप अधिकच कमकुवत होतात.त्वचेचा रंग पिवळसर पांढरा असल्याने हे साप सहज शत्रूच्या नजरेस पडतात आणि शिकार होतात.

## याचे दोन प्रकार आहेत

**अर्ध रंगहीन साप (PARTIAL ALBINO)**:- या प्रकारा मध्ये त्वचेचा रंग पिवळसर पांढरा होतो पण जीभेचा आणि डोळ्यांचा रंग बदलत नाही.ते मूळ रंगाचे असतात.

**पूर्ण रंगहीन साप (ALBINO or TOTAL ALBINO)**:- या प्रकारा मध्ये त्वचेच्या रंगा सोबतच डोळ्यांचा व जीभेचाही रंग बदलतो.डोळे व जीभ लाल किंवा गुलाबी रंगाची असते.

# सर्पमित्र

साप ही राष्ट्रीय संपत्ती असून तिचे रक्षण करणे हे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य आहे.पूर्वी गारुडी सापांचा खेळ करत व  सापांबद्दल भीती आणि अंधश्रद्धा पसरवत.त्यात फिल्म इंडस्ट्री तर कशी मागे पडेल म्हणा.त्यांनीही साप या प्राण्याला नकारार्थी दृष्टीकोनातून जगासमोर मांडले.साप पुंगीच्या तालावर नाचतो काय,दुध काय पितो,जोडीदाराची हत्या झाल्यास बदला काय घेतो अश्या एक ना अनेक चुकीचा गोष्टी सापांबद्दल दाखवून गारुड्यांच्या खांद्याला खांदा लावल्याचे दिसते.या गोष्टी आजही मनात खोलवर रुजल्या असून साप हा आपला ‘शत्रूच’ आहे असा एक चुकीचा समज आपण करून घेतला आहे.

## महाराष्ट्रातील पहिला सर्पमित्र

साधारणतः ६० वर्षांपूर्वी महाराष्ट्रातील पहिला सर्पमित्र कोल्हापूर जिल्ह्यातील ढोलगरवाडी या गावी उदयास आला.श्री बाबुराव टक्केकर हे महाराष्ट्रातील पहिले सर्पमित्र होय.लहान असताना श्री टक्केकर हे खेकडे पकडण्यासाठी नदीकाठी जात.तेथे त्यांना सापही दिसत.साप पकडण्याची व त्याबद्दल जाणून घेण्याची तीव्र इच्छा असल्याने त्यांनी पुस्तके व त्या विषयातील तज्ज्ञांकडून मार्गदर्शन घेतले व १९६४ साली त्यांनी तंत्रशुद्ध पद्धतीने साप पकडण्यास सुरुवात केली. १९६६ साली याच प्रेरणेतून जगातील एकमेव अशी सर्पशाळा सुरु केली जी आजही अविरतपणे सर्प संवर्धनाचे काम करत आहे.

# सर्पमित्र आणि त्याचे कार्य

जस जसे सर्पमित्रांचा उदय होऊ लागला तस तसे गारुड्यांचा परदा फाश होऊन त्यांचा अस्त होत गेला. जेथे सर्पमित्र कार्यरत नाहीत तेथे आजही गारुडी पहावयास मिळतात.सापांमुळे सर्पमित्रांना अनन्यसाधारण महत्व प्राप्त झाले आहे.साप वाचवण्याची जिद्द व तळमळ यामुळे सर्पमित्रांना समाजात मानाचे स्थान प्राप्त झाले.साप निघाल्याचे कळताच हातातील काम टाकून उन्ह ,वारा ,पाऊस,दिवस,रात्र,अंधार,वेळ,काळ,या एक ना अनेक अडथळयांचा विचार न करता सर्पमित्र साप पकडण्यास जातो.साप पकडून त्याला निसर्गाच्या सानिद्ध्यात सोडणे (कोणत्याही अपेक्षेविना) हे कार्य सर्पमित्र आजवर करत आल्याचे दिसते.पण आजच्या या डिजिटल युगामध्ये बरेच हौशे नौशे लोक साप पकडून सापांसोबत स्टंट करत असल्याचे दिसून येते.असे करणे बऱ्याचदा जीवावर बेतले असून त्यात जीवितहानीही झाली आहे.अश्या गोष्टींमुळे तळमळीने व जीवतोडून काम करणाऱ्या सर्पमित्रांची प्रतिमा मलीन होत असल्याचे दिसते. सापांसोबत स्टंट करून सोशल मेडिया वर टाकणाऱ्या डिजिटली शिक्षित गारुड्यांना आळा घालणे गरजेचे आहे.






## सर्पमित्रांसाठी

## सर्पमित्रांनी साप पकडण्यास जाण्यापूर्वी...

1) साप पकडणे खरोखरच आवश्यक आहे का याची पडताळणी करावी. साप घराजवळ आल्यास भीतीचे वातावरण निर्माण होते.पण प्रत्येक वेळी साप पकडणे गरजेचे असतेच असे नाही,तो आल्या वाटेने निघूनही जात असतो.
2) फोन करणाऱ्या व्यक्तीला आश्वस्त करा व शांत राहण्यास सांगा.त्याचा पत्ता,घराजवळील खुण इत्यादी लक्षपूर्वक नोंदवून घ्या.
3) तुम्ही घटनास्थळी पोहोचेपर्यंत तेथील उपस्थितांना योग्य ती काळजी घेण्यास सांगा. *(घटनास्थळी जाताना दारू पिऊन जाऊ नये नाहीतर नशा दवाखान्यातही उतरू शकते.जर वाचलात तर )*
4) घटनास्थळी जातेवेळी साप पकडण्याचे साहित्य तपासून सोबत घेऊन जा.

## घटनास्थळी पोहोचल्यानंतर साप पकडतेवेळी घ्यावयाची काळजी...

1) साप जर अडगळीत असेल तर पुरेसा प्रकाश उपलब्ध करून अडगळ दूर करण्यास सांगा.सोबत आणलेले साप पकडण्याचे साहित्य (hooks,pipes ,tubes,tongs) पडताळा.मगच त्यांचा वापर करावा.
2) साप कमीतकमी हाताळावा किंबहुना साप पकडायच्या साहित्यांनी पकडल्यास उत्तम.
3) साप भक्ष खाल्लेला असल्यास किंवा जखमी असल्यास त्याला बिलकुल हात न लावता सोबत आणलेल्या पाईपच्या साह्याने थेट गडद रंगाच्या पिशवीत पकडावा.
4) नेहमी दोन सर्पमित्रांनी सर्पबचाव कार्यासाठी गेल्यास उत्तम.
5) साप पकडल्याची वेळ,सापाची जात,अभिप्राय अश्या गोष्टी लिहून घ्याव्यात व रेकॉर्ड बुक तयार करावे जेणेकरून साप पकडल्याचा पुरावाही राहील व वर्षाकाठी कोणता साप कोणत्या काळात सापडतो याचा अभ्यासही होईल.

# साप सोडताना...

1) साप बिनविषारी असल्यास त्या सापाचे महत्व तेथील उपस्थितांना पटवून साप सापडलेल्या घटनास्थळापासून जवळच सोडावे.

2) साप विषारी असल्यास मानवी वस्तीपासून लांब सोडावा.

3) साप निशाचर असल्यास रात्रीच्या वेळेस सोडावे.दिनचर असल्यास दिवसा सोडावे.

4) साप शक्य तितक्या लवकर २४ तासांच्या आत स्थानिक सर्प पुनर्वसन धोरणानुसार वनखात्याच्या मार्गदर्शनाखाली निसर्गात मुक्त करावा.

5) वनखात्याच्या परवानगीनुसार वैद्यकीय उपचाराव्यतीरिक्त साप स्वतः जवळ बाळगू नये.

6) कोणत्याही परिस्थितीत जिवंत सापाचे प्रदर्शन करू नये.असे करणे वन्यजीव कायद्यानुसार गुन्हा ठरतो.

7) सापांना गरज नसताना हाताळणे सापाच्या जीवावर बेतू शकते.

8) साप सोडताना पुरावा म्हणून  त्याचा व्हिडियो किंवा फोटो काढणे.



# साप आणि वन्यजीव अधिनियम १९७२

वन्यजीवांना संरक्षण देणारा कायदा १९७२ साली अमलात आला असून या कायद्यानुसार सापांनाही संरक्षण मिळाले आहे.(बेकायदेशीरपणे) साप पकडणे,सापांना मारणे,त्यांचे प्रदर्शन करणे,तस्करी करणे,जवळ बाळगणे,त्यांचा छळ करणे हा गुन्हा आहे.सोबतच १९७५ च्या निर्यात धोरण-वन्याजीवांपासून उत्पन्नाविषयीचा कायद्यात सुद्धा सापांना संरक्षण दिले आहे.वन्यजीव संरक्षण कायदा १९७२ मध्ये 6 परिशिष्ट आहेत.परिशिष्ट 1(भाग 2 ),परिशिष्ट 2 (भाग 2 ) आणि परिशिष्ट 4 यांच्या अंतर्गत सापांना संरक्षण मिळाले आहे. परिशिष्ट 1 (भाग 2 ) व परिशिष्ट 2 (भाग 2) या सूचीतील सापांना अधिक संरक्षण असून त्याबाबतचे नियमही अत्यंत कडक आहेत.याच्या अंतर्गत येणारे नियम मोडल्यास (सापांना मारणे,त्यांचे प्रदर्शन,तस्करी,छळ इत्यादी) 3 ते ७ वर्षाची कैद व 10 ते १५ हजार रुपयांचा दंड किंवा दोन्हीही होऊ शकते.परिशिष्ट 4 मधील सापांनाही कडक नियम लागू होतात.Animal cruelty act मधेही सापांना संरक्षण देण्यात आले आहे.

## परिशिष्टातील साप खालीलप्रमाणे

**परिशिष्ट 1**

**1)भारतीय अजगर**(भारतात सापडणारे सर्व अजगर)

**2 भारतीय अंडीखाऊ साप(Indian egg eater snake)**

**परिशिष्ट 2**

**1) नाग 2) नागराज 3) धामण 4) पाणदिवड 5) शेवाळी पाणदिवड 6) घोणस 7) श्वानमुखी सर्प**

**परिशिष्ट 4**

**परिशिष्ट 1 व परिशिष्ट 2 मधील साप वगळता बाकी सर्व साप परिशिष्ट 4 मध्ये समाविष्ट करण्यात आले आहेत.**

# सापाची अंतरशरीर रचना




| | |
|---|---|
| 1) अन्न नलिका (ESOPHAGUS) | 9) वायूकोश (AIR SAC) |
| 2) श्वास नलिका (TRACHEA) | 10) पित्ताशय (GALL BLADDER) |
| 3) फुफ्फुसे (TRACHEAL LUNGS) | 11) स्वादूपिंड (PANCREAS) |
| 4) डावे फुफ्फुस (LEFT LUNG) | 12) प्लीहा (SPLEEN) |
| 5) उजवे फुफ्फुस (RIGHT LUNG) | 13) आतडे (INTESTINES) |
| 6) हृदय (HEART) | 14) अंडकोष (TESTICLES) |
| 7) यकृत (LIVER) | 15) मूत्रपिंड (KIDNEYS) |
| 8) जठर (STOMACH) | 16) गुद्द्वार (ANUS) |

# सापाच्या शरीरासंबंधी माहिती

## डोळे

सापांना दोन डोळे असतात पण ते माणसांप्रमाणे तीक्ष्ण नसतात.सापाच्या शरीराचा रंग जरी वेग वेगळा असला तरी सापांना माणसाप्रमाणे रंगीत प्रतिमा दिसत नाही.त्यांची द्रुष्टी रंगहीन असते.त्यांना रंगीत प्रतिमाही कृष्णधवल (Black & White) दिसते, त्यातही ५ फुटा पर्यंतच स्वच्छ दिसतं त्यापलीकडील धूसर दिसतं. माणसांना कोणतीही प्रतिमा त्रिमितीय (3D) दिसते पण सापांना तीच प्रतिमा द्वीमितीय (2D) दिसते.यावरून सापांची द्रुष्टी किती कमजोर आहे याचा अंदाज येतो.सापांच्या डोळ्यावर पापण्या नसतात. त्या ऐवजी एक पारदर्शक पडदा असतो. त्याला इंग्रजी मध्ये **ब्रिली (Brille)** म्हणतात.हा पडदा डोळ्यांमध्ये धुलीकण जाण्यापासून रोखतो आणि डोळ्यांचे रक्षण करतो.सापांच्या डोळ्यावर पापण्या नसल्यामुळे साप डोळे उघडे ठेवूनच झोपतात.त्यामुळेच साप झोपलेला आहे कि जागा आहे हे कळणे अवघड असते. झाडावर राहणाऱ्या सापांचे डोळे तीक्ष्ण असतात तर बिळात राहणाऱ्यांचे डोळे कमजोर असतात.सापांच्या डोळ्यांची बाहुली गोल,आडवी किंवा उभी असते.गोल बाहुलीचे साप शक्यतो दिनचर असतात तर उभ्या किंवा आडव्या बाहुलीचे साप निशाचर असतात.

**गोल बाहुली**



**आडवी बाहुली**



**उभी बाहुली**



# जिभ

साप आपल्या जिभेने वास घेतो.सापाच्या तोंडासमोर एक छिद्र असते ज्यामुळे साप आपले तोंड बंद ठेवून सुद्धा जीभ आत बाहेर करू शकतो.सापाची जीभ दुभाजलेली असते त्यामुळे सापाला दिशाज्ञान प्राप्त होते.जिभेच्या साह्याने वातावरणातील धुलीकणांना गोळा करून गंधग्राह्य ग्रंथी मध्ये **(JACOBSON'S ORGAN)** सोडतो.तेथून गंधाचे पृथक्करण करून मेंदू कडे पाठवला जातो.तेथे परत मेंदू गंधाचा प्रकार ठरवतो.गंधग्राह्य ग्रंथीचा (**JACOBSON'S ORGAN**) शोध १८०९ मध्ये **लूडविग जेकबसन** या शास्त्रज्ञाने लावला त्यामुळे या ग्रंथीला जेकबसन ग्रंथी (**JACOBSON'S ORGAN**) असे म्हणतात.सापाचे गंध ज्ञान माणसापेक्षा दहा हजार पटीने जास्त असते.



# सापाची हाडं



साप सरपटणारा प्राणी असून त्याच्या शरीरात १३० ते ५०० हाडं असतात.सापाच्या प्रजातीवरून त्यांच्या शरीरातील हाडांची संख्या ठरते.म्हणजेच वाळा या लहान सापांना कमी हाडं असतात तर अजगरासारख्या अजस्त्र सापाला जास्त हाडं असतात. पण सापाच्या लवचीकतेमुळे सापाच्या शरीरात हाडं नसावेत असे आपल्याला वाटते. सापळ्यातील प्रत्येक बरगडीला मासपेशी जोडलेली असते.हाड व मासपेश्या एकमेकांना लवचीकतेने  व मजबुतीने जोडले गेले असल्यामुळे सापाचे शरीर इतके लवचीक असते.

सापाचा जबडा माणसाच्या जबड्याप्रमाणे एकमेकांना जोडलेला नसतो.यामुळेच साप आपल्या तोंडाच्या आकारापेक्षा मोठे भक्ष खाऊ शकतो.सापाचा जबडा १५० डिग्री पर्यंत उघडू शकतो.

# उष्मासंवेदनग्राहक खाचा

काही सापांना डोळे व नाकपुड्या यांच्या मध्ये दोन खाचा असतात.या खाचांना इंग्रजी मध्ये हिट सेन्सिंग पिट्स किंवा थर्मल पिट्स म्हणतात.या खाचा नाकपुड्या पेक्षा मोठ्या असतात.या खाचा सापा समोरील प्राण्यांच्या शरीरातील उष्णता ग्रहण करतात आणि यामुळेच साप अंधारातही भक्ष अचूकपणे पकडू शकतो. सभोवतालच्या तापमानातील अतिसूक्ष्म बदलही या सापांना सहज जाणवतो.या सापांना ०.०००३ डिग्री सेल्सियस इतका सूक्ष्म बदलही लक्षात येतो.शास्त्रज्ञाना काही सापांना ०.०००१ डिग्री सेल्सियस इतका फरक लक्षात आला असल्याचे दिसून आले आहे.

महाराष्ट्रात सापडणारे **चापडा** व **अजगर** या सापांना **उष्मासंवेदनग्राहक खाचा** आहेत.





**लाल रेषा उष्मासंवेदनग्राहक खाचा दर्शवितात तर काळ्या रेषा सापाच्या नाकपुड्या दर्शवितात.**

## नाक

साप नाकाचा उपयोग फक्त श्वास घेण्यासाठीच करतात.वास घेण्यासाठी तो जिभेचा वापर करतो .सापाला 2 नाकपुड्या असतात.समुद्रातील सापांना दर 20 ते 30 मिनिटांनी पाण्या बाहेर येऊन श्वास घ्यावा लागतो.जास्त ऑक्सिजन घेता यावा यासाठी त्यांच्या नाकपुड्या इतर सापांचा तुलनेत मोठ्या असतात.

**जमिनीवर राहणाऱ्या सापांच्या नाकपुड्या**



**समुद्रा मध्ये राहणाऱ्या सापांच्या नाकपुड्या**



## कान

सापाला बाह्य कान नसतात,त्यामुळे सभोवतालच्या हालचालीचा आवाज त्याला ऐकू येत नाही आणि म्हणूनच पुंगीच काय तर ढोल ताशे जरी वाजवले तरी सापाला ऐकू येत नाही. तो फक्त पुंगीच्या हालचालीवर डोलतो आवाजावर नाही.पण सापाला आतील बाजूस कान असतात जे त्याच्या जबड्याला जोडलेल असतात.याच्या साह्याने साप आपला जबडा जमिनीवर ठेवून जमिनीवर होणारे कंपन ग्रहण करतो.

# दात

सापाला सरासरी ६० ते ८० दात असतात.सापाचे सर्व दात आतील बाजूस वळलेले असतात.दातांच्या या बनावटी मुळेच सापाला त्याचे भक्ष चावून न खाता अख्खे गिळावे लागते.विषारी व निमविषारी सापांना दोन मोठे विषदंत असतात.निमविषारी सापांचे विषदंत आतील बाजूस जबड्याच्या मध्य भागी असतात तर विषारी सापांचे विषदंत जबड्याच्या वरील बाजूस असतात.या दातांना विषदंत म्हणतात.हे दात पोकळ असतात आणि यातून विष भक्षाच्या शरीरात टोचवले जाते.काही विषारी सापांचे विषदंत आतील बाजूस दुमडलेले असतात आणि दंश करतेवेळी उघडतात.

उदा;-घोणस,फुरसे चापडा.



**न हलणारे विषदंत**



**आतील बाजूस दुमडलेले व हलणारे विषदंत**



**निमविषारी सापाचे विषदंत**

# शेपूट

साप आपल्या शेपटीचा उपयोग त्यांच्या जीवन शैलीत वेग वेगळ्या प्रकारे करतात.वेग वेगळ्या जातीच्या सापांच्या शेपटीचा आकार वेगवेगळा असतो.

1) **गोल व आखूड शेपूट:-** या प्रकार चे साप आपल्या शेपटीचा उपयोग भाक्षाला व शत्रूला चकवा देण्यासाठी करतात.डोके शरीर खाली लपवून शेपटी शरीराच्या वरील बाजूस ठेवतात.यामुळे भाक्ष व शत्रू शेपटीलाच डोके समजतात. उदा मांडूळ,वाळा,डुरक्या घोणस.





2) **लांब व सडपातळ शेपूट:-** या प्रकारचे साप आपल्या शेपटीचा उपयोग झाडांवर शरीराचा समतोल राखण्यासाठी करतात तर काही साप आपली टोकदार सडपातळ  शेपूट अळी प्रमाणे हलवून भाक्षाला आकर्षित करतात. उदा-मांजऱ्या, रुका सर्प, तस्कर, हरणटोळ इत्यादी.





# शेपूट

**तिरकस चपटी शेपूट:-** अश्या शेपटीचे साप मुख्यतः खापरखवल्या साप असून आपल्या शेपटीने जमिनीत खड्डा करून बीळ करतात व बिळातून बाहेर निघाल्यावर आपल्या शेपटीने बिळाचे द्वार बंद करतात असे आढळून आले आहे.



**चपटी वल्ह्यासारखी शेपूट:-** अश्या प्रकारचे साप आपल्या शेपटीचा उपयोग पाण्यात पोहण्यासाठी करतात.उदा:-समुद्रसर्प.



# डोके

साप जेथे राहतो त्यावर सापाच्या डोक्याचा आकार अवलंबून असतो.झाडावर राहणाऱ्या सापांचे डोके निमुळते व लांब असते.त्यामुळे या सापांना झाडी झुडपातून मार्ग काढणे सोपे होते.जमिनीखाली राहणाऱ्या सापांच्या डोक्याचा आकार अर्ध गोलाकार असतो.यामुळे सापांना मातीमध्ये मार्ग काढणे सोपे होते.त्रिकोणी डोके असणाऱ्या सापांना पालापाचोळयात लपणे सोपे होते.

सापाच्या डोक्याचा आकारावरून साप विषारी कि बिनविषारी ओळखू येतो हे चुकीचे आहे.

**पालापाचोळयात राहणारे त्रिकोणी व आखूड डोक्याचे साप**



**जमिनीखाली व मातीत राहणारे अर्ध गोलाकार डोक्याचे साप**

**पालापाचोळयात तसेच झाडावर राहणारे टोकदार व त्रिकोणी डोक्याचे साप**





# खवले

खवले हे सापाच्या शरीराचे कवच असतात.खवले अनेक प्रकारे सापाच्या त्वचेचे रक्षण करतात.सरपटताना होणाऱ्या घर्षणा पासून खवल्या मुळे त्वचेचे रक्षण होते.
अतिनील **(ultraviolet)** व अविरक्त **(Infrared)** किरणांपासून त्वचेचे रक्षण होते.
साप जेथे राहतो त्यावरून त्याच्या खवल्याचा प्रकार ठरतो.

1. **गुळगुळीत खवले** (**smooth scales**):-जमिनीखाली राहणाऱ्या सापांचे खवले गुळगुळीत असतात.या प्रकारच्या खवल्यांमुळे सापांना बिळातून मुक्त संचार करणे सोपे होते. उदा:-मांडूळ,नाग,धामण,मृदुकाय सर्प इत्यादी.
2. **खरखरीत खवले** (**Rough Scales**):-या प्रकारच्या खवल्यांचे साप पाला पाचोळा व अडगळीच्या ठिकाणी जास्त राहतात.या प्रकारच्या खवल्यांमुळे टोकदार गोष्टींपासून सापांचा बचाव होतो.उदा:-गवत्या,घोणस,फुरसे,नानेटी,इत्यादी.
3. **चामखीळी खवले** (**Spike Scales**):-या प्रकारचे खवले मुख्यतः समुद्रात राहणाऱ्या सापांचे असतात.हे खवले उठावदार चामखीळी प्रमाणे असतात.पोहताना पाण्यातील घर्षणा पासून त्वचेचे रक्षण होते. उदा:-एकेरी,समुद्र्सर्प इत्यादी.

**गुळगुळीत खवले**



**खरखरीत खवले**



**चामखीळी खवले**



# कात

साप कात टाकतो म्हणजे अमर होतो असा एक गैरसमज आजही ऐकावयास मिळतो. पण कात टाकणे हि एक नैसर्गिक क्रिया आहे.माणूसही कात टाकत असतो पण माणसाच्या शरीरावर घर्मग्रंथी असल्याने शरीरातील टाकाऊ पदार्थ घामा वाटे बाहेर टाकले जातात.डोक्यातील कोंडा(**Dandruff**),केस आणि नखं हे कातीचेच प्रकार आहेत. पण सापाच्या शरीरावर घर्मग्रंथी नसल्याने त्याची कात एकसंध नाकाच्या टोका पासून शेपटी-च्या टोका पर्यंत निघते.कात म्हणजे सापाच्या शरीरावरील मृत पेशींचा थर असतो. आकाराने व वयाने लहान असणारा साप लवकर कात टाकतो.

**कात काढण्याची प्रक्रिया:-**या कालावधीत साप खूप चिडचिडा होतो.सापाचे डोळेही कातीने झाकल्यामुळे त्याला अस्पष्ट दिसू लागते.हा काळ 8 ते 12 दिवसांचा असतो. सापाचे शरीर आणि कात या दोन्ही मध्ये निर्माण झालेल्या लीम्फेटिक स्त्रावामुळे सापाचा रंग अस्पष्ट दिसू लागतो.कात काढतेवेळी साप त्याचे डोके खडबडीत जागेवर घासतो आणि आधी तोंडावरील कात काढतो आणि नंतर शेपटी पर्यंत पूर्ण कात काढतो. काही वेळेस सापाची कात पूर्ण निघत नाही आणि अर्धवट राहीलेली कात केस आहेत असे वाटते. पण सापाच्या शरीरावर केस येऊ शकत नाहीत कारण केस येण्यासाठी घर्मग्रंथीची गरज असते जी सापामध्ये नसते.जन्मलेले साप दोन ते तीन दिवसात कात टाकतात.





# सापाचे विष

सापाचे विष म्हणजे एक प्रकारची लाळ असते जी सापाला अन्न पचवायला पाचक रस म्हणून काम करते.सापाच्या विषामध्ये प्रथिने व एन्झाइम असे अनेक घटक असतात.हे विष एका ग्रंथी मध्ये साठवलं जातं ज्याला **विषग्रंथी** म्हणतात.हे विष रक्तात मिसळल्यावरच घातक ठरते.

महाराष्ट्रात विषारी सापाच्या विषाचे २ प्रमुख प्रकार आहेत.

**1) न्यूरोटॉक्सिक:- हे विष मज्जा संस्थेवर म्हणजेच मेंदू वर परिणाम करते.**

**उदा:-नाग,मण्यार,पोवळा,नागराज.**

**2) हिमोटॉक्सिक:-या विषाचा परिणाम रक्तावर होतो.**

**उदा:-घोणस,फुरसे,चापडा.**



# सापाचे मिलन

मिलनासाठी दोन नरांचे भांडण



मिलनासाठी दोन नरांचे भांडण



नर व मादीचे मिलन



# सापाचे प्रजनन






साप अंडी देताना



साप पिल्लू देताना



सापाचे पिल्लू अंड्यातून बाहेर येताना

# सापाचे प्रजनन

बहुतेक साप वर्षातून एकदाच प्रजनन करतात आणि त्यांचा काळही एकच असतो.साप उन्हाळ्यात मिलन करतात तर पावसाळ्यात प्रजनन.म्हणूनच पावसाळ्यात पिल्लांचे प्रमाण जास्त दिसून येते.मिलन काळात मादी एक प्रकारचे समागम द्रव्य (sex Pheromones) सोडते ज्याच्या गंधाने आसपास चे नर या मादीकडे आकर्षित होतात.कित्येकदा एकापेक्षा जास्त नर या मादीकडे आकर्षित होतात आणि त्यांच्यामध्ये मिलनासाठी स्पर्धा लागते. अश्या वेळी दोन नर साप एकमेकांना विळखा घालून उंच उभारून दुसऱ्याला खाली पडण्याचा प्रयत्न करतात.याला आपण मिलन समजतो पण हे मिलन नासून मादीला मिळवण्यासाठी केलेली एक लढाई असते.जो जास्त उंच उभारेल त्यालाच मादी सोबत मिलनाचा हक्क असतो.मिलनावेळी नर मादी एकमेकांना विळखा घालून कित्येक तास जमिनीवर या स्थितीत पडून असतात.मिलनानंतर नर व मादी वेगवेगळ्या दिशेला निघून जातात.ते आयुष्यभर जोडीने राहत नाहीत.सापाचे प्रजनन दोन प्रकारे होते.काही साप अंडी घालतात (अंडज) तर काही प्रत्यक्ष पिल्लं देतात(जारज).काही सापांमध्ये फक्त मादीच असते नर नसतो.(उदा:- वाळा सर्प)म्हणजेच या सापांमध्ये मिलन होत नाही तर **अनिषेकजनन (parthenogenesis)** या प्रक्रीये द्वारे प्रजनन होते.काही सापांच्या माद्या नराचे शुक्राणू बिजनलिका (Oviduct) मध्ये साठवून ठेवतात आणि योग्य वेळी फलीत करून अंडे किंवा पिल्ले देतात.एका अभ्यासानुसार मादी 5 वर्षापेक्षा अधिक काळापर्यंत नराचे शुक्राणू तिच्या बिजनलिके मध्ये साठवून ठेवू शकते.अंडी घातल्यानंतर पिल्ले 40 ते 100 दिवसांनी अंड्याच्या बाहेर पडतात. अंडी घातल्यानंतर मादी अंड्यांचे रक्षण करत नाही.अपवाद नागराज,नाग,अजगर.नागराज हा एकमेव साप आहे जो घरटे बनवतो आणि त्यात अंडी घालतो.नागराजाची मादी अंड्यातून पिल्ले बाहेर येईपर्यंत उपाशी राहून घरट्याचे रक्षण करते.काही वेळेस नर सुद्धा घरट्याचे रक्षण करत असल्याचे दिसून आले आहे.

# विना खवल्यांचा साप

सापाचे खवले जमीन,दगड,काटे इत्यादी टोकदार गोष्टींशी होणाऱ्या घर्षणा पासून त्वचेचे रक्षण करतात.म्हणूनच साप कसल्याही अडगळ व अडचणीतून मार्ग काढू शकतो.पण निसर्गात काही साप विना खवल्याचे जन्मतात.त्यांच्या शरीरावर खवल्यांचा थरच नसतो किंवा अगदी कमी प्रमाणात असतो.पण सापाच्या शरीराच्या खालच्या बाजूस हा थर कमी अधिक प्रमाणात असतो.हा त्वचा रोग नसून बाह्य त्वचेवरील (Epidermis) आवरणाची कमतरता असते ज्याच्या पासून खवल्यांची निर्मिती होते.सापाच्या शरीरावर खवले नसण्याचे प्रमुख कारण म्हणजे बिटा-केराटीन (**β-keratin**)ची कमतरता होय.हे एक प्रकारचे प्रथिने आहे.हि कमतरता जन्मतः असते किंवा काही कालांतराने होते.जर नर आणि मादी दोघेही विना खवल्याचे असतील तर त्यांची पिल्लेही पूर्ण विना खवल्याची जन्मतात.आणि नर किंवा मादी पैकी एक विना खवल्याचा असेल तर त्याची पिल्ले काही प्रमाणात विना खवल्याची जन्मतात.या सापांना निसर्गात जगण्यासाठी खूप संघर्ष करावा लागतो . खवल्यांच्या कमतरते मुळे ते मंद गतीने हालचाल करतात.अश्या परिस्थितीत यांना लपणे अवघड होते आणि यामुळे सहज शत्रूच्या नजरेस पडतात. हे साप जास्त वेगाने हालचाल केल्यास त्वचेचे जास्त घर्षण होऊन इजा होऊ शकते.खवल्यांच्या कमतरते मुळे अतिनील (**ultraviolet**) व अवरक्त (**Infrared**) किरणांचा या सापांवर अतिशय परिणाम होतो.हि किरणे जास्त काळ थेट त्वचेवर पडल्याने अन्य त्वचारोगही होण्याची दाट शक्यता असते.अंगावर खवले नसले तरी हे साप कात टाकतात.शरीराच्या वरील भागावर खवले नसले तरी पोटाकडील बाजूस खवले असतात.इतर सापाच्या तूलनेत या सापांची कात जास्त पातळ असते.हे साप दिसायला अगदी नकली रबराच्या सापासारखे वाटतात.अंगावर खवले नसल्याने त्यांची त्वचा जळाल्या प्रमाणे दिसते.या सापांना जगण्यासाठी कराव्या लागणाऱ्या संघर्षामुळे हे साप जास्त दिवस जगू शकत नाहीत आणि म्हणूनच हे अतिशय दुर्मिळ असतात.

# सापाचे खाद्य

सापाच्या उत्क्रांतीमध्ये त्याचे खाद्य हा एक महत्वाचा घटक आहे.सापाचे आवडते खाद्य उंदीर असल्याचे आपण ऐकले आहे,कदाचीत उंदीरही बिळात राहत असल्याने त्याचे ते आवडते खाद्य बनले असावे आणि त्याचबरोबर बिळात व आसपास सापडणारे पाल,सरडे,बेडूक,किडे,गांडूळ इत्यादी साप खाऊ लागला.काही सापांना काहीच खाद्य मिळाले नसल्याने त्यांनी इतर साप खाणे पसंत केले.मोठे साप आपलं वर्चस्व कायम ठेवण्यासाठी लहान सापांना मारून खाऊ लागले.

साप मांसाहारी प्राणी असून तो स्वतः जिवंत शिकार कारून खातो.प्रत्येक सापाचे अन्न त्याच्या आकारा वरून ठरले आहे.लहान साप छोटे कीटक व त्यांची अंडी खातात, मध्यम आकाराचे साप उंदीर,घूस,पाल,सरडे,पक्षी,पक्षांची अंडी खातात तर आकाराने मोठे व अवाढव्य साप मांजर,शेळी,हरीण,गायीचे पिल्लू इत्यादी खातात.अंडीखाऊ साप फक्त पक्षांची अंडी खाऊन जगतात.हा साप खराब झालेले व भृणाची वाढ झालेले अंडी खात नाही.त्याला ताज्या व सडलेल्या अंड्यातील फरक समजतो.सापाचा जबडा माणसाच्या जबड्या प्रमाणे जोडलेला नसतो त्यामुळे साप आपलं तोंड 150° पर्यंत उघडतो आणि म्हणूनच साप आपल्या आकारा पेक्षा मोठा प्राणी गिळू शकतो.



# सर्पदंश व मांत्रिक

साप म्हणजे साक्षात मृत्यू असे आपण समजतो .पण सगळेच साप विषारी नसतात. याउलट बहुतांश साप बिनविषारी असतात.विषारी सापाने दंश केला तरी वेळेवर उपचार मिळाल्यास माणूस वाचू शकतो.त्यातही विषारी साप चावताना शरीरात विष सोडेलच असे नाही.इतकं असून सुद्धा सर्पदंशाने भारतात सुमारे ५०,००० हून अधिक लोक मृत्युमुखी पडतात.याचे मुख्य कारण म्हणजे सर्पदंशावीषयी असलेले अज्ञान. एकीकडे तंत्रज्ञान भरारी घेत असताना दुसरीकडे मात्र आजही आपण अंधश्रद्धेच्या विळख्यातून बाहेर पडल्याचे दिसत नाही.सर्पदंश झाल्यानंतर काय करावे हे बऱ्याच लोकांना माहिती नसतं आणि म्हणूनच असे लोक मांत्रिकाकडे जाणे पसंत करतात पण खरच मांत्रिक सर्पदंशावर उपचार करू शकतो का? त्याच्याकडे अशी कोणती डिग्री असते ज्याचा अभ्यास करून तो हे उपचार करतो? त्याला खरच उपचार करता येत असतील तर मग इतके मोठ मोठे दवाखाने उभे करण्याची गरज काय होती? आणि प्रत्येक दवाखान्यात सर्पदंशावर उपचार करण्यासाठी एकतरी मांत्रिक असायला हवा होता,तो तिथे का दिसत नाही? असे प्रश्न अंधश्रद्धा बाळगणाऱ्या लोकांच्या मनात मुळीच येऊ शकत नाही.याचे कारण म्हणजे त्यांना आलेले (दिशाभूल करणारे) अनुभव.बऱ्याच वेळेस सर्पदंश हा बिनविषारी सापाचा असतो.आणि अश्या सापांच्या दंशामुळे माणसाच्या जीवितास कसलाही धोका नसतो. हि गोष्ट सर्वसामान्यांच्या लक्षात येत नाही आणि ते उपचारा साठी मांत्रिका कडे जातात.मांत्रिकही तसा डोक्याने अर्ध-हुशार असतो.त्याला लक्षात येतं की हा सर्पदंश बिनविषारी सापाचा आहे पण तो आपल्याला असे सांगत नाही (धंद्यातले सिक्रेट सांगितले तर त्याचा धंदा बंद पडेल ना).

तो म्हणतो “तुमच्या माणसाला भयंकर विषारी सापाने दंश केला आहे.पण घाबरू नका मी माझ्या मंत्राने आणि माझ्या जवळ असलेल्या जडीबुटीने याला लगेच बरा करतो” खर तर या व्यक्तीस कसल्याच उपचाराची गरज नसते पण अज्ञाना मुळे ही गोष्ट आपल्याला माहिती नसते आणि या मांत्रिकामूळेच आपल्या माणसाचे प्राण वाचले असे समजतो आणि **मुह मांगी किमत** या मांत्रिकाला अदा करतो.(मग काय झाला ना मांत्रिकाचा धंदा जोरात.)हे झालं बिनविषारी सर्पदंशाच.पण समजा एखाद्याला विषारी सापाने दंश केला असेल आणि त्या व्यातीस विषबाधा झाली असेल तर मांत्रिकाच्या हे लक्षात येते कि हा सर्पदंश विषारी आहे.पण तो असे कधीच म्हणत नाही की याचे उपचार मला येत नाही. उलट तुमच्याच चुका तो काढायला लागतो,देवाचा कोप आहे,तुमच्या कर्माचे फळ आहे,तुम्ही याला माझ्याकडे आणायला उशीर केलात वगैरे वगैरे.काही मांत्रिक तर मंत्र तंत्र करत सर्पदंश झालेल्या व्यक्तीस ताटकळत ठेवतात आणि त्यातच त्याचा जीव जातो.आणि मग देवालाच हे मान्य नव्हते त्याला मी तर काय करणार असे म्हणून तो आपली बाजू ‘सेफ’ करतो.तर सर्पदंश झाल्यास दवाखान्यात जाणे हा एकमेव उपाय आहे आणि तांत्रिक मांत्रिक हे सगळं थोथांड आहे हे आपणास आता लक्षात आले असेल.

*अरे मी तर इकडे आहे मग तू तिकडे कुठे जातोयस??? सापाने तुला दंश केलाय ना*

*मी राहुल सरांचे पुस्तक वाचले आहे आणि आता मला माहिती झाले आहे कि सर्प दंश झाल्यावर दवाखान्यातच जाणे गरजेचे आहे मांत्रिकाकडे नाही*









# वाळा
# Worm snake



**शास्त्रीय नाव :-** *Ramphotyphlops braminus* **कुळ:-** *Typhlopidae*

**वर्णन:-** ***बिनविषारी*** . रंग लालसर काळा किंवा तपकिरी.

**लांबी:-** भारतातील सर्वात लहान साप.सरासरी 12 ते १५ सेमी.अधिकतम 1 फुट.

**प्रजनन:-**अंडज. मादी 5 ते 8 अंडी घालते.

**खाद्य:-** गांडूळ,मुंग्या ,मुंग्यांची अंडी,वाळवी इत्यादी छोटे कीटक.

**वस्तीस्थान:-**बहुदा जमिनीखाली याचे आयुष्य जाते.पाऊस पडल्यावर जमिनीवर येतो.चिखल मातीत व जास्त आर्द्रतेच्या ठिकाणी सापडतो.

**परिशिष्ठ:- IV**

**वैशिष्ठ्ये:-**हा साप हुबेहूब गांडूळा सारखा दिसतो.याचे डोळे अतिशय लहान असतात आणि लवकर दिसत नाहीत त्यामुळे या सापाला अंधळा साप असेही म्हणतात.याचे डोके आणि शेपूट सारखेच दिसते.याला स्पर्श झाल्यास खूप वळवळतो.या सापांमध्ये नर साप नसतो.फक्त मादीच असते.या माद्या नराच्या मिलनाशिवाय अंडी घालतात.या प्रक्रीयेला अनिषेकजनन म्हणतात.हा साप निशाचर आहे.हा साप अतिशय लहान असल्याने जगभर भाजीपाला,फळभाज्या आदीतून पसरला आणि म्हणूनच याला इंग्रजी मध्ये **फ्लावर पॉट स्नेक** म्हणतात.हा साप माणसांच्या व प्राण्यांच्या कानामध्ये जाऊन इजा पोहोचवतो असा एक गैरसमज आहे.भारतात या सापाच्या 18 प्रजाती सापडतात.

# खापरखवल्या
# Shieldtail Snake



**शास्त्रीय नाव :-** *Uropeltis Phipsonii* **कुळ:-** *Uropeltidae*

**वर्णन:-** ***बिनविषारी*** . रंग काळा,तपकिरी,नीळा रंगावर पिवळे किंवा पांढरे ठिपके.

**लांबी**:- सरासरी १५ ते २० सेमी.अधिकतम १ फुट.

**प्रजनन**:- ***जारज*** .मादी ५ ते ६ पिल्लांना जन्म देते.

**खाद्य**:- गांडूळ,अळया,छोटे किडे इत्यादी.

**वस्तीस्थान**:- जमिनीखाली राहतो.पावसाळयात जमिनीवर येतो आणि पालापाचोळयात राहतो.

**परिशिष्ठ:-** **IV**

**वैशिष्ठ्ये:-**या सापाच्या तोंडाचा आकार निमुळता तर शेपटी तिरकस -चपटी व बोथट असते.खवले गुळगुळीत असतात त्यामुळे या सापाच्या शरीराला माती वा चिखल चिकटत नाही.हा साप निशाचर असला तरी दिवसाही दिसतो.दिवसेंदिवस होणाऱ्या जंगल तोडी मुळे या सापांच्या अस्तित्वास धोका निर्माण झाला आहे.खापरा सारखे याचे खवले मुलायम असतात म्हणूनच याला मराठी मध्ये खापरखवल्या असे म्हणतात.इंग्रजी मध्ये या सापाला **शिल्डटेल स्नेक** असे म्हणतात.**शिल्ड** चा अर्थ ढाल असा होतो. धोक्याच्या वेळी हा आपले तोंड शरीराखाली घालून शेपटी शरीरावर ठेवतो व शत्रू या शेपटीला तोंड समजून शेपटी वर हल्ला करतो.यामुळे सापाच्या तोंडाचा बचाव होतो. शेपटी खरोखरच याला **सेफ्टी** प्रदान करते.खापरखवल्याचे भारतात ३८ जाती आहेत.

# भारतीय दगडी अजगर
# Indian Rock Python



**शास्त्रीय नाव :-** *python molurus molurus* **कुळ:-** *Pythonidae*

**वर्णन :-** ***बिनविषारी*. फिकट तपकिरी रंगावर गडद तपकिरी धब्बे असतात. खवले मऊ.डोक्यावर कोनासारखी आकृती.डोळयातल्या बाहुल्या उभ्या.शेपटी आखूड़.

**लांबी:-** **सरासरी** 9 फुट 10 इंच, **अधिकतम लांबी** 24 फुट 11 इंच

**प्रजनन :-** ***अंडज***.जानेवारी ते मार्च दरम्यान मादी ३० ते ८० अंडी घालते, ९० ते १०० दिवसात पिल्ले अंडयातून बाहेर येतात.

**खाद्य :-** ससे,हरणाची पिल्ले,डुक्कर,घुशी, कोंबड्या, शेळया, मेंढ्या इ.

**वस्तीस्थान :-** हा साप घनदाट जंगलात झाडीत राहणे पसंत करतो.

**परिशिष्ठ :-** I

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.नाकपुड्याच्या खाली असलेल्या उष्णसंवेदनग्राहक खाचामुळे त्यांना भक्ष्य शोधण्यास मदत होते.भक्ष्याला तोंडाने पकडल्यावर शरीराचा विळखा घालतो व आवळून गुदमरून मारतो,मग भक्ष्याच्या तोंडाकडून सुरुवात करून गिळतो. मध्यम आकाराचा प्राणी पचवायला त्याला अंदाजे २० ते 25 आठवडे लागतात. अजगराच्या भारतात 04 जाती सापडतात.अजगर या सापास वन्यजीव अधिनियम १९७२ च्या अंतर्गत परिशिष्ठ एक मध्ये समाविष्ट करण्यात आले आहे.त्यामुळे याची हत्या किंवा छळ केल्यास 3 ते ७ वर्षांची कैद व १० ते २५ हजार दंड होऊ शकतो.

# डुरक्या घोणस
# Common Sand Boa



**शास्त्रीय नाव :-** *Gongylophis conicus* **कुळ:-** *Boidae*

**वर्णन:-** ***बिनविषारी***.तपकिरी रंगावर गडद तपकिरी असमान धब्बे.शरीर गोलाकार, शेपटी काणसा प्रमाणे खरखरीत.मुख्यतः मातीत राहात असल्याने डोळे छोटे आणि निशाचर असल्यामुळे डोळ्यातील बाहुली उभी.दिवसाही दिसतो.

**लांबी:-** सरासरी १.५ फूट,अधिकतम ३.५ फुट.

**प्रजनन:-** ***जारज***.जुलै ऑगस्ट दरम्यान मादी ५ ते ८ पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-** बेडूक,पाल,सरडे,छोटे सस्तन प्राणी व पक्षी.

**वस्तीस्थान:-** रेताड जमीन,जंगले,जमिनीखाली उंदरांच्या बिळात राहतो.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये:-** डुरक्या घोणस हा साप अजगरा सारखा दिसतो म्हणून  बऱ्याचदा अजगराचे पिल्लू समजला जातो.हा साप शिकार करतेवेळी भक्षास घट्ट आवळून पीळे मारतो आणि भाक्षाचा जीव गुदमरे पर्यंत तसाच आवळून ठेवतो आणि मेल्यावर त्याला खातो.याची शेपूट काणसा प्रमाणे किंवा करवती प्रमाणे खरखरीत असते ज्याचा उपयोग साप भुसभूशीत जमिनीतील माती अंगावर ओढून त्याच्या खाली लपतो.या सापाचा शरीराचा व डोक्याचा आकार विषारी घोणस सापाप्रमाणे असतो.या सापाला हाताळल्यास सुरवातीला हल्ला करतो.अन्य सापांच्या तुलनेत डुरक्या घोणस चे दात अधिक तिक्ष्ण असतात आणि त्यांची संख्याही जास्त असते.

# मांडूळ
# Earth Boa/red Sand Boa











# मांडूळ
# Earth Boa/red Sand Boa



**शास्त्रीय नाव :-** *Eryx johnii* **कुळ:-** *Boidae*

**वर्णन:-** *बिनविषारी*.रंग लालसर तपकिरी.शेपूट आखूड असून हुबेहूब तोंडासारखी दिसते.डोळे लहान व उभी बाहुली.पिल्लांचा रंग लालसर व काळे-तपकिरी आडवे पट्टे शेपटीकडे गडद होत जातात.कालांतराने हे पट्टे नाहीसे होतात आणि सापाचा रंग तपकिरी होतो.

**लांबी:-**सरासरी 1.5 फुट,अधिकतम 3.5 फुट.

**प्रजनन:-** ***जारज***.मादी ऑगस्ट-सप्टेंबर दरम्यान 6 ते 10 पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-** उंदीर,पाल सरडे,छोटे पक्षी इत्यादी.

**वस्तीस्थान:-** जंगल,किनारपट्टीचा प्रदेश खडकाळ प्रदेश.जमीन भुसभुशीत करून जमिनीत लपणारा साप.नांगरणी वेळेस दिसतो.पावसाळ्यात सर्रास जमिनीवर दिसतो.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिवसा व रात्रीही दिसतो.मांडूळ सापाच्या तोंडाचा आणि शेपटीचा आकार सारखा असल्याने याला दोन्ही बाजूला तोंड असल्याचा भास होतो म्हणूनच याला दुतोंड्या म्हणतात.जमीन तोंडाने भुसभुशीत करण्यासाठी त्याच्या तोंडचे टोक अगदी टणक असते.भक्षाला व शत्रूला चकवा देण्यासाठी तोंड शरीराखाली लपवतो आणि शेपटी शरीरावर ठेवतो.यामुळे ते फसतात. शरीर जाडजूड असल्याने पटकन पळता व लपता येत नाही म्हणून मारला जातो.या सापाबद्दल समाजात पसरलेल्या अंधश्रद्धे मुळे याची मोठ्या प्रमाणत तस्करी केली जाते.यामुळे हा साप नामशेष होत आहे.

# तस्कर
# Trinket snake



शास्त्रीय नाव :- *Coelognathus helena* कुळ :- *Colubridae*

वर्णन:- ***बिनविषारी*** .रंग पिवळसर तपकिरी.मानेवर दोन काळ्या रेषा.डोक्यापासून शरीराच्या अर्ध्या भागापर्यंत काळ्या व पांढऱ्या रंगाचे नक्षीदार पट्टे.डोळे मोठे व गोल बाहुली.डोळयाच्या मागे तिरकस रेष.

लांबी:- सरासरी 3 फुट , अधिकतम 5.5 फुट.

प्रजनन:- ***अंडज***.मादी मार्च ते मे दरम्यान 7 ते 15 अंडी घालते.सुमारे ६० ते ७० दिवसांनी पिल्ले बाहेर येतात.

खाद्य:-उंदीर,पाल,सरडे,छोटे पक्षी इत्यादी.

वस्तीस्थान:-उंदरांचे बीळ.खडकाळ प्रदेश,नागरी वस्ती.झाडांवर चढण्यात तरबेज असल्याने झाडावरही वास्तव्य.

परिशिष्ठ:-**IV**

वैशिष्ट्ये :- दिवसा व रात्रीही आढळतो.शरीरावरील नक्षी वाकी (**Trinket**) या दागिन्या सारखी दिसते.हा साप शहरी भागात जास्त प्रमाणात आढळतो.गुपचूप लपत छपत चोरी छुपके घराजवळ येऊन उंदीर बेडूक व पाल खातो आणि यामुळेच त्याला तस्कर किंवा चोर साप असे म्हणतात.डिवचला गेला असता तोंड उघडून हल्ला करतो.त्यावेळी तोंडाच्या आतील भाग काळा असल्याचे दिसते.महाराष्ट्रात 2 तर भारतात या सापाच्या 10 प्रजाती सापडतात.

# पहाडी तस्कर

# Montane Trinket snake



**शास्त्रीय नाव** :- *Coelognathus helena monticollaris*

**कुळ** :-***Colubridae***

वर्णन:- *बिनविषारी*.रंग पिवळसर तपकिरी ,मानेपासून शरीराच्या मध्य भागा पर्यंत जाड नक्षीदार आडवे पट्टे.हे पट्टे माने जवळ गडद तर शेपटी कडे पुसट होत जातात.डोळयाच्या खाली तिरकस व उभी अश्या दोन रेषा.

लांबी:- सरासरी 3 फुट,अधिकतम 5 फुट.

प्रजनन:-***अंडज.*** मार्च ते एप्रिल दरम्यान मादी 5 ते १५ अंडी घालते.सुमारे ६० ते ७० दिवसांनी पिल्ले बाहेर पडतात.

खाद्य:- उंदीर,पाल,बेडूक इत्यादी सस्तन प्राणी व क्वचित प्रसंगी छोटे पक्षी.

वस्तीस्थान:-भातशेती,जंगल व जंगलालगत असलेली खेडी व शहरे.पहाडी प्रदेशात जास्त आढळ.

परिशिष्ठ:- **IV**

वैशिष्ट्ये :-दिनचर व निशाचर.मुख्यतः पहाडी व जंगली प्रदेशात राहत असल्याने झाडावरही उत्तमरीत्या वावरु शकतो.सामान्य तस्कर च्या तुलनेत पहाडी तस्कर जास्त रागीट असतो.डिवचला असता तोंड उघडून हल्ला करतो.

# एकेरी
# File snake



**शास्त्रीय नाव :-** *Acrochordus granulatus*

**कुळ:-** *Acrochordidae*

**वर्णन:-** *बिनविषारी.* गडद राखाडी शरीरावर डोक्या पासून शेपटी पर्यंत पांढरे आडवे पट्टे.तोंड आखूड व चामखीळी खवले. शेपूट चपटे.

**लांबी:-** सरासरी 3 फुट अधिकतम 4 फुट.

**प्रजनन:-** ***जारज.***मादी 5 ते 7 पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-**हा साप समुद्रात राहात असल्याने तेथील छोटे मासे व इतर जीव.

**वस्तीस्थान:-**मुख्यतः खाडीत.काही वेळेस समुद्र किनाऱ्यावर.

**परिशिष्ठ:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-**एकेरी साप खाडी मध्ये सापडतो.मासेमारी करणाऱ्या लोकांच्या जाळीमध्ये अडकतो.याचे खवले खरखरीत असतात.शेपूट चपटी असल्यामुळे याला पाण्यात पोहण्यासाठी अत्यंत उपयोगी पडते.जमिनीवर या सापास व्यवस्तीत सरपटता येत नाही. हा साप समुद्र सर्पासारखा दिसतो पण बिनविषारी आहे.सापाचा आणि पाण्यालगत असलेल्या वाळूचा रंग सारखाच असल्याने हा साप लवकर दिसून येत नाही.समुद्र सर्प अर्धा तास विना ऑक्सिजनचे पाण्यात राहू शकतात.अन्य सापांच्या तुलनेत एकेरी या सापाच्या शरीरामध्ये रक्ताचे प्रमाण दुप्पट असते व लाल रक्त पेशींचे प्रमाणही जास्त असते.यामुळेच हा साप रक्तातील ऑक्सिजन वापरून 2 तास पाण्यात राहू शकतो.

# धामण

# Indian Rat snake








# धामण
# Indian Rat snake



**शास्त्रीय नाव :-** *Ptyas mucosa.* **कुळ:-** ***Colubridae***

**वर्णन:-** ***बिनविषारी*** रंग तपकिरी ,शेवाळी,पिवळा,किंवा काळा.शेपटीकडून जाळीदार नक्षी शरीराच्या अर्ध्यापर्यंत फिकट होत जाते.ओठांवरील खवल्यांवर काळया उभ्या रेषा.डोळे मोठे व गोल बाहुली.

**लांबी:-** सरासरी 6 फुट अधिकतम 11.5 फुट.

**प्रजनन:-*अंडज.*** मार्च ते मे दरम्यान मादी 10 ते १५ अंडी घालते व त्यातून 2 ते 3 महिन्याने पिल्ले बाहेर पडतात.

**खाद्य:-** मुख्य खाद्य उंदीर व घूस.बेडूक पाल सरडे छोटे पक्षी व क्वचित प्रसंगी साप.

**वस्तीस्थान:-** उंदरांची बिळे,धान्याची कोठारे,शेत,नागरी वस्ती,खाकाळ प्रदेश, गवताळ प्रदेश, जंगले, किनारी प्रदेश,दलदलीचे प्रदेश अश्या सर्व ठिकाणी.

**परिशिष्ट:-** II

**वैशिष्ट्ये :-**हा साप चपळ असल्याने उंदीर पकडण्यात तरबेज असतो.उंदरांचा पाठलाग बिळात घुसून करतो आणि त्याला फस्त करतो.दिसायला नागासारखा असल्याने याला विषारी समजून मारले जाते.लांबी आणि चपळता जास्त असल्याने उंदीर खाण्याची क्षमताही जास्त आहे आणि यामुळेच शेतीची नास धूस करणाऱ्या उंदरांवरती नियंत्रण ठेवतो. म्हणूनच याला शेतकऱ्याचा मित्र म्हणतात.या सापाची संख्या जास्त असल्याने मनुष्य वस्ती जवळ आढळतो.त्यामुळे या सापाबद्दल अनेक गैरसमज पसरले आहेत.याचे नाव एका दोरखंडा (धामण) वरून पडले आहे.

# पट्टेरी धूळनागीण
# Banded Racer snake



**शास्त्रीय नाव :-** *Argyrogena fasciolata* **कुळ:-***Colubridae*

**वर्णन:-** ***बिनविषारी*** रंग फिकट किंवा गडद तपकिरी.डोके निमुळते.मऊ व गुळगुळीत खवले.शेपूट लांब व निमुळते.पिल्लांच्या शरीरावर पांढरे आडवे पट्टे असतात जे वयानुसार पुसट होत जातात.डोळ्यातील बाहुली गोल.

**लांबी :-** सरासरी 3 फुट,अधिकतम 5.5 फुट.

**प्रजनन :-*****अंडज***.फेब्रुवारी ते मे दरम्यान मादी 5 ते 12 अंडी घालते.2 ते 3 महिन्याने पिल्ले अंड्यातून बाहेर पडतात.

**खाद्य :-**उंदीर,पाल,बेडूक इत्यादी.

**वस्तीस्थान :-**उंदरांचे बीळ,दगड विटांचे ढिगारे व नागरी वस्ती जवळ.

**परिशिष्ठ :-** **IV**

**वैशिष्ट्ये :-**दिनचर.दिसायला हुबेहूब नागासारखा दिसतो पण नाग फणा काढतो आणि धूळनागीण फणा काढत नाही.अतिशय चपळ.धूळ जशी क्षणात नाहीशी होते तसा हा साप नाहीसा होतो म्हणून याला धुळनागीण असे नाव पडले.याच्या चपळते मुळेच याला इंग्रजी मध्ये **रेसर** असे म्हणतात.या सापाचे नागाशी अतिशय साम्य असल्याने याला विषारी समजून मारले जाते.धूळनागीण या नवावरून याला नागाची नागीण समजले जाते पण ते चुकीचे आहे.झाडावरही हा साप खूप चपळतेने वावरू शकतो.

# चित्रांग नायकूळ

## Slender/Gunther's Racer



**शास्त्रीय नाव:-** *Coluber grecilis / platyceps gracilis*

**कुळ:-***Colubridae*

**वर्णन:-** ***बिनविषारी*** .राखाडी-तपकिरी रंगाच्या शरीरावर काळी किनार असेलेल पिवळे खवले.हे खवले डोक्याकडे गडद तर शेपटीकडे फिकट होत जातात.डोक्यावर 'V' आकाराची खूण.डोळे मोठे व डोळ्यातील बाहुली गोल.शेपूट निमुळते.

**लांबी:-** सरासरी 1.5 फुट, अधिकतम 3.5 फुट.

**प्रजनन:-** अंडज.मादी मार्च ते मे दरम्यान 5 ते ७ अंडी घालते.४५ ते ६० दिवसांनी पिल्ले अंड्यातून बाहेर येतात.

**खाद्य:-** पाल,सरडे व छोटे कीटक.

**वस्तीस्थान:-** माळरान.काही वेळेस नागरी वस्तींमध्येही सापडल्याची नोंद.

**परिशिष्ट:-** IV

**वैशिष्ट्ये:-** मुख्यतः दिनचर.पण रात्रीही शिकारीसाठी बाहेर पडतो.हा साप शांत स्वभावाचा असून हाताळल्यास सुरुवातीला वळवळ करतो पण काही वेळाने शांत होतो.हा साप दिसायला अत्यंत देखणा असून त्याच्या शरीरावरील नक्षी अगदी कोरल्या सारखी दिसते.

# रजत बन्सी

# Black Headed Royal snake



**शास्त्रीय नाव :-** *Spalerosophis atriceps*

**कुळ:-** ***Colubridae***

**वर्णन:-** ***बिनविषारी***.रंग फिकट बदामी किंवा नारंगी.शरीरावर वेडेवाकडे विखुरलेले निळे ठिपके.डोळे मध्यम आकाराचे व बाहुली गोल.मान लालसर तर काही वेळेस डोके काळे.

**लांबी:-** सरासरी 5 फुट.अधिकतम ७ फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.जुलै ऑगस्ट दरम्यान मादी 5 ते 8 अंडी घालते.

**खाद्य:-** उंदीर,पाल,सरडे व छोटे पक्षी.

**वस्तीस्थान:-** उंदरांचे बीळ,झाडी झुडूपात व झाडांवर.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये:-** निशाचर.डिवचला गेला असता शरीराचे वेटोळे घालून जोरत फुत्कारतो.रंग आकर्षक व चकचकीत असल्याने याला इंग्रजी मध्ये रॉयल स्नेक असे नाव पडले आहे.गुजरात व राजस्थान येथे सापडणारा हा साप प्रामुख्याने महाराष्ट्राच्या उत्तरेस सापडतो.हिमालयातील काही प्रदेशांमध्ये हा २००० मीटर पेक्षा जास्त उंचीवर सापडल्याची नोंद आहे.

# कुकरी सर्प
# Common Kukri snake



**शास्त्रीय नाव :-** *Oligodon arnensis* **कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** *बिनविषारी*. रंग राखाडी किंवा लालसर तपकिरी.डोक्या पासून शेपटी पर्यंत काळे किंवा गडद तपकिरी पट्टे.शेपटी कडे पुसट होत जातात.डोक्यावर इंग्रजीतील 'V' आकारा प्रमाणे खुण.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकतम 3 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी डिसेंबर ते जानेवारी दरम्यान अंडी घालते.६० ते ७० दिवसांनी पिल्ले अंड्यातून बाहेर पडतात.

**खाद्य:-** लहान पाली,उंदीर सापसुरळी व छोटे कीटक.

**वस्तीस्थान:-** दगड विटांच्या ढिगा मध्ये,पडक्या घरात,मनुष्य वस्तीन्जवळ.

**परिशिष्ठ:-** IV

**वैशिष्ट्ये :-**दिनचर व निशाचर.नेपाळी लोकांकडे असणाऱ्या कुकरी या चाकू सारखी  याच्या दातांची धार असते त्यामुळे याला कुकरी असे नाव पडले आहे.हा साप जरी शांत असला तरी याचे पिल्ल अतिशय रंगीट असतात आणि जवळ गेल्यास वारंवार हल्ला करतात.दिसायला मण्यार या विषारी सापासारखा दिसतो त्यामुळे याला विषारी समजून याची हत्या केली जाते.भारतात कुकरीच्या २४ प्रजाती सापडतात तर महाराष्ट्रात 2 प्रजाती सापडतात.

# रसेल कुकरी
# Russell's Kukri snake



**शास्त्रीय नाव :-** *Oligodon taeniolatus*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** *बिनविषारी*.तपकिरी रंगाच्या शरीरावर गडद तपकिरी धब्बे.धब्ब्यांची बॉर्डर पांढरी असते.हे धब्बे शेपटीकडे नाहीसे होत जातात.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 2 फुट.

**प्रजनन:-*अंडज***.एप्रिल ते मे दरम्यान मादी 6 ते 10 अंडी घालते.५० ते ७० दिवसांनी पिल्ले अंड्यातून बाहेर पडतात.

**खाद्य:-** छोटे कीटक,पाल व सरड्याचे पिल्लू व अंडी इत्यादी.

**वस्तीस्थान:-** शहराचा हद्दवाढ विभागात जास्त आढळतो.शहर व खेड्यातही आढळ.

**परिशिष्टे:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.हा शांत स्वभावाचा असून क्वचितच चावतो.वेगवेगळ्या प्रकारच्या नक्षीमध्ये हा सापडतो.काही फिकट रंगामध्ये आढळतात तर काहीच रंग गडद असतो व त्यावरील धब्बेही गडद असतात.

# रुका सर्प

# Bronzeback tree snake



**शास्त्रीय नाव :-** *Dendrelaphis tristis*

**कुळ:-*Colubridae***

**वर्णन:-** *बिनविषारी* डोक्यापासून शेपटी पर्यंत तपकिरी रंगाची रेष.पोटाकडचा भाग पिवळसर , निळसर किंवा फिकट हिरवा. वरच्या ओठाचा रंग फिकट बदामी. मोठ्या सोनेरी डोळ्यात गोल बाहुली.

**लांबी:-** सरासरी 3 फुट.अधिकतम 5.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी मार्च ते एप्रिल दरम्यान 5 ते 8 अंडी घालते.

**खाद्य:-** बेडूक,पाल,सरडे छोटे पक्षी इत्यादी.

**वस्तीस्थान:-** प्रामुख्याने झाडावर राहतो.दमट जंगल,किनारी प्रदेश व इतर कोरड्या झुडूपी प्रदेशात.

**परिशिष्ट:- IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर.प्रामुख्याने झाडावर राहात असल्याने अतिशय चपळ व वेगवान. डिवचला गेला असता मान फुगवून खवल्यामध्ये लपलेला निळा रंग प्रदर्शित करतो. शरीर सडपातळ व लांबलचक असते.शेपटी निमुळती असते यामुळे शेपटीचा उपयोग फांदी ला लटकून भक्ष पकडण्यासाठी करतो. ब्रॉंझ या धातूच्या रंगाप्रमाणे याच्या पाठीचा रंग असतो म्हणूनच याला इंग्रजी मध्ये ब्रॉंझ ब्याक ट्री स्नेक म्हणतात.

# कवड्या सर्प
# Common Wolf Snake



**शास्त्रीय नाव:-** *Lycodon aulicus.* **कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** *बिनविषारी.*शरीर लालसर तपकिरी रंगाचे.मानेजवळ रुंद पांढरा पिवळसर पट्टा ज्याच्या मध्ये खाच असते.डोक्यापासून सुरु होणारे पांढरे पिवळसर पट्टे शेपटीकडे फिकट होत जातात.डोके चपटे व डोळे मोठे.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 2.5 फुट.

**प्रजनन:-** *अंडज.*मार्च ते मे दरम्यान मादी 5 ते 12 अंडी घालते.पिल्ले ६० ते ७० दिवसांनी अंड्यातून बाहेर येतात.

**खाद्य:-** पाल,सापसुरळी,बेडूक इत्यादी.

**वस्तीस्थान:-** मनुष्यवस्ती जवळ पालीच्या शोधात,पडक्या घरात,दगड मातीच्या ढिगात.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर पण दिवसाही आढळतो.आवडते खाद्य पाल असल्याने उभ्या खडबडीत असणाऱ्या भिंतीही चढतो. हा साप मण्यार या विषारी सापासारखा दिसत असल्याने याला विषारी समजून मारले जाते.अतिशय चिडखोर असणारा हा साप हाताळल्यास कडकडून 10 ते 12 वेळा चावतो.लवकर शांत होत नसल्याने वारंवार चावतो.

# पिवळ्या ठिपक्यांचा कवड्या सर्प
# Yellow Spotted Wolf Snake



**शास्त्रीय नाव :-** *lycodon falvomaculatus*

**कुळ:-** ***Colubridae***

**वर्णन:-** *बिनविषारी.*संपूर्ण काळ्या रंगाच्या शरीरावर पिवळ्या ठिपक्यांचे आडवे पट्टे असतात.पोटाकडील भागावर पांढरे ठिपके.डोळे काळे व डोक्याचा रंगही काळा असल्याने डोळे लवकर दिसत नाहीत.ओठांच्या खालचा भाग पांढरा.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 1.5 फुट.

**प्रजनन:-** अंडज.जून-जुलै दरम्यान मादी 2 ते 4 अंडी घालते.

**खाद्य:-** जंगली पाली,सरडे व काही वेळेस कीटक.

**वस्तीस्थान:-** शहर व ग्रामीण भागातही आढळतो. पालीच्या शोधात घराजवळ.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.शांत व लाजाळू.कवड्या सापाच्या तुलनेत याची संख्या खूपच कमी असल्याने क्वचितच दिसतो.शांत स्वभाव असल्याने क्वचित प्रसंगीच चावतो.

# पट्टेरी कवड्या सर्प
# Barred Wolf Snake



**शास्त्रीय नाव :-** *lycodon striatus*

**कुळ:-** ***Colubridae***

**वर्णन:-** *बिनविषारी*.संपूर्ण काळ्या रंगाच्या शरीरावर पांढरे-पिवळे आडवे पट्टे असतात.पोट पांढरे.डोळे काळे व डोक्याचा रंगही काळा असल्याने डोळे लवकर दिसत नाहीत.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 1.5 फुट.

**प्रजनन:-**अंडज.जुलै-ऑगस्ट दरम्यान मादी 2 ते 4 अंडी घालते.

**खाद्य:-** जंगली पाली,सरडे व काही वेळेस कीटक.

**वस्तीस्थान:-** खेडोपाडी जेथे पाल असते.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** कवड्या सापाच्या तुलनेत याची संख्या खूपच कमी असल्याने क्वचितच दिसतो.शांत स्वभाव असल्याने क्वचित प्रसंगीच चावतो.

# त्रावणकोर कवड्या सर्प
# Travancore Wolf Snake



**शास्त्रीय नाव :-** *lycodon travancoricus*

**कुळ:-***Colubridae*

**वर्णन:-** *बिनविषारी*.शरीर काळ किंवा गडद तपकिरी रंगाचे.त्यावर पांढरे किंवा पिवळे ठिपक्यांचे पट्टे.डोळे संपूर्ण काळे व मध्यम आकाराचे. गुळगुळीत खवले.

**लांबी:-** सरासरी 1.5 फुट.अधिकतम 2.5 फुट.

**प्रजनन:-** अंडज.मादी 3 ते ७ अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** पूर्व व पश्चिम घाटातील जंगलात.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.पालीच्या शोधात रात्री बाहेर पडतो.पहिल्यांदा या सापाची नोंद केरळ मधील त्रावणकोर या जागी झाली म्हणून या सापाला त्रावणकोर कवड्या असे नाव देण्यात आले आहे.हा साप महाराष्ट्राच्या पश्चिम घाटातील जंगलात सापडतो.

# काळतोंड्या सर्प
# Black-Headed Snake



**शास्त्रीय नाव:-** *Sibynophis subpunctatus*

**कुळ:-** ***Colubridae***

**वर्णन:-** *बिनविषारी*.तोंड व डोके काळे.डोक्याच्या मधोमध दोन तपकिरी-बदामी रंगाचे धब्बे.मानेच्या कड्यावर पांढरी- बदामी रंगाची पट्टी.लालसर तपकिरी रंगाच्या शरीरावर डोक्यापासून शेपटी पर्यंत छोटे काळ्या रंगाचे ठिपके.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 1.5 फुट.

**प्रजनन:-** *अंडज*.मादी 3 ते 5 अंडी घालते.

**खाद्य:-** पालीचे पिल्लू,छोटे कीटक,गांडूळ इत्यादी.

**वस्तीस्थान:-** पालापाचोळयात,लाकूड व दगडांच्या ढिगा खाली.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये:-**दिनचर व निशाचर.या सापाचे तोंड काळे असल्यामुळे याला काळतोंड्या असे म्हणतात.याला कृष्णशीर्ष असेही म्हणले जाते.हा साप जनिमी पासून आपली मान उंच करतो त्यामुळे याला नागाचे पिल्लू समजले जाते.शरीर सडपातळ असून करंगळीच्या जाडीपेक्षाही लहान असते त्यामुळे हा साप खूप चपळ असतो.हा साप हुबेहूब पोवळा या विषारी सापासारखा दिसतो.काळतोंड्या व पोवळा या दोन्ही सापातील अंतर सूक्ष्म निरीक्षण केल्यावरच लक्षात येते.

# पाणदिवड

# Checkered Keelback/Water Snake



**शास्त्रीय नाव:-** *Xenochrophis/fowlea piscator* **कुळ:-**Colubridae

**वर्णन :-** ***बिनविषारी.***लाल,काळया,शेवाळी,पिवळया किंवा राखाडी रंगांच्या खवल्यांमध्ये पांढऱ्या किंवा पिवळया रंगाचे एका आड एक चौकोनी बुद्धिबळाच्या पटासारखी नक्षी.डोळे मोठे व गोल बाहुली.डोळयांच्या मागे दोन काळया तिरकस रेषा.

**लांबी :-** सरासरी 2 फुट.अधिकतम 5.5 फुट.

**प्रजनन :-** ***अंडज.***नोव्हेंबर ते डिसेंबर दरम्यान मादी ४० ते ७० अंडी घालते.

**खाद्य :-** मासे ,बेडूक इत्यादी.

**वस्तीस्थान :-** नदी,तलाव,ओढा, डबके,गटार,नाला आदी पाणथळ ठिकाणी.

**परिशिष्ट :-** **II**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.प्रामुख्याने पाण्यात किंवा पाण्यालगत असलेल्या ठिकाणी राहणे पसंत करतो. स्वभाव अतिशय रागीट व तापट असणारा हा साप व्यवस्थित रित्या न हाताळल्यास सुटका करून घेण्यासाठी गोल गोल फिरून स्वतःची शेपटी तोडून घेतो.सुटकेसाठी काही वेळेस घाण वासाचा स्राव सोडतो.डिवचला गेला असता मान चपटी करून उभा राहतो आणि हल्ला करतो.पकडण्याचा प्रयत्न केल्यास वाकडातिकडा किंवा तिरकस पळतो.या सापाला ग्रामीण भागात विरुळा असे म्हणतात.पावसाळयात पाण्याच्या प्रवाहा सोबत वाहून येतो.हा साप पाण्यात असताना बिनविषारी तर जमिनीवर आल्यास विषारी होतो हे साफ खोटे आहे.

# नानेटी
# Striped Keelback



**शास्त्रीय नाव :-** *Amphiesma stolatum*

**कुळ:-***Colubridae*

**वर्णन:-** *बिनविषारी*.शरीराचा रंग तपकिरी-लाल.डोक्यापासून शेपटी पर्यंत दोन्ही बाजूस पिवळे पट्टे.माने पासून शेपटीच्या अर्ध्या पर्यंत काळे किंवा गडद तपकिरी आडवे पट्टे.डोळे मोठे व त्यात गोल बाहुली.खवले खरखरीत.

**लांबी:-**सरासरी 2 फुट.अधिकतम 2.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज.***मिलन काळात ७ ते 8 नर मादीच्या मागे फिरताना आढळतात.मादी 10 ते 25 अंडी घालते.

**खाद्य:-** बेडूक,पाल,सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** भातशेती,गवताळ प्रदेश,पाण्याची डबकी व अन्य पाणथळ ठिकाणी राहतो.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर.शांत स्वभावाचा हा साप डिवचला गेला असता मानेकाडचा भाग फुगवून खवल्यांचा मागे लपलेला निळा व लाल रंग प्रदर्शित करतो.पाणथळ ठीकानांसोबतच हा साप बागेतील व गावातील गवताळ भागांमध्ये आढळतो.एक साप मारल्यास अनेक साप त्या ठिकाणी बदला घेण्यासाठी येतात असा एक गैरसमज आहे.

# लाल डोक्याची नानेटी
# Beddome's Keelback



**शास्त्रीय नाव :-** *Amphiesma beddomei*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** ***बिनविषारी***.तपकिरी किंवा फिकट तपकिरी रंगाच्या शरीरावर डोक्या पासून अर्ध्या पर्यंत काळ्या-पांढऱ्या ठीक्यांचे आडवे पट्टे असतात.डोळे मोठे.गोल बाहुली.वरच्या ओठाचा रंग पिवळसर पांढरा.

**लांबी:-** सरासरी 1.5 फुट. अधिकतम 2.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मार्च एप्रिल दरम्यान मादी 5 ते 9 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,बेडूक,छोटे सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** जंगल,पाणथळ ठिकाणी व पालापाचोळयात.

**परिशिष्ठ:-** IV

**वैशिष्ट्ये:-** दिनचर.शरीरावरील रंगामुळे पालापाचोळयात अगदी सहज मिसळून जातो.आंबोली सारख्या घनदाट जंगलात सापडल्याची नोंद.

# गवत्या

# Green Keelback/Grass snake



**शास्त्रीय नाव :-** *Macropisthodon plumbicolor* **कुळ:-** *Colubridae*

**वर्णन :-** ***बिनविषारी***.संपूर्ण शरीर गवता प्रमाणे हिरवे.माने जवळ काळ्या ठिपक्यांचे पट्टे.पिल्लांचा मानेकडील भाग काळा,त्यामागे काळे पट्टे जे वाढीनुसार नाहीसे होत जातात.खवले खरखरीत.डोळे मोठे व त्यातील बाहुली गोल.

**लांबी :-** सरासरी 2 फुट.अधिकतम 3.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मार्च ते जून दरम्यान मादी 10 ते १५ अंडी घालते.

**खाद्य:-** बेडूक,पाल,सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** रंग हिरवा असल्याने प्रामुख्याने हिरव्या गवताळ भागात आढळतो.दाट वस्ती,बाग व जंगले.

**परिशिष्ठ:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर पण दिवसाही दिसतो.हा साप गवतात राहणे पसंत करतो त्यामुळे याला गवत्या असे म्हणतात.इंग्रजी मधेही याला गवतावरून ग्रास स्नेक असे म्हणतात.या सापाला विषारी सापाच्या विषदंता प्रमाणे दोन मोठे दात असतात.विषदंत पोकळ असतात पण गवत्या सापाचे हे दात भरीव असतात.हा साप काही वेळेस मान फुगवून नागाप्रमाणे कुंडली मारून बसतो.हा साप चापडा हा सापाप्रमाणे दिसतो. एखाद्याच्या मनातील सापाविषयी भीती घालवायची असल्यास हा साप योग्य आहे. अत्यंत लाजाळू असणारा हा साप क्वचितच चावल्याची नोंद आहे.

# शेवाळी पाणदिवड
# Olive Keelback



**शास्त्रीय नाव :-** *Atretium schistosum*

**कुळ :-***Colubridae*

**वर्णन:-** ***बिनविषारी***.हिरवट शेवाळी किंवा गडद शेवाळी रंग.पोटाकडील भाग पिवळसर,फिकट बदामी अथवा नारंगी.डोळे मध्यम व त्यामध्ये लहान गोल बाहुली.

**लांबी:-** सरासरी 1.5 फुर.अधिक्तम 3.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी १५ ते 25 अंडी घालते.

**खाद्य:-** मासे,बेडूक इत्यादी.

**वस्तीस्थान:-** तलाव,नदी,डबके,पाण्यात व हिरव्या गवतात राहणे पसंत करतो.

**परिशिष्ट:-** **II**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर.या सापाचा रंग ऑलीव्ह या फळा प्रमाणे असल्यामुळे याला **Olive Keelback** असे म्हणतात.या सापाचा स्वभाव शांत असला तरी डिवचला गेल्यास मान फुगवून हल्ला करतो.पाण्यात राहून डासांची अंडी खातो ज्यामुळे डासांपासून होणाऱ्या जीवघेण्या रोगावर नियंत्रण ठेवले जाते.

# मृदूकाय सर्प
# Indian smooth snake



**शास्त्रीय नाव :-** *Coronella brachyura*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** ***बिनविषारी***.रंग तपकिरी काळपट किंवा पिवळसर त्यावर पांढरे पिवळसर ठिपके.खवले अत्यंत मऊ.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 1.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज.***मादी 5 ते 6 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** पालापाचोळा,झाड-झुडूप,काहीवेळेस पडक्या घरांमध्ये .

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये:-** खवले अत्यंत मऊ व गुळगुळीत असतात.मृदू म्हणजे मऊ आणि काया म्हणजे शरीर.यावरूनच या सापाचे नाव मृदुकाय असे पडले आहे.हा साप दिसायला अत्यंत सुंदर असतो. हा साप शांत स्वभावाचा असल्याने चावत नाही. घनदाट जंगलांमध्ये राहणारा हा साप मनुष्यवस्तीजवळ अनेकदा सापडल्याच्या नोंदी आहेत परंतु याचा पुरेसा अभ्यास अजूनही झालेला दिसत नाही.

# झिलाण

# Glossy Marsh Snake



**शास्त्रीय नाव:-** *Gerarda prevostiana*

**कुळ:-** *Homalopsidae*

**वर्णन:-** *निमविषरी*.राखाडी, काळा चमकदार रंग.डोके व मान एकसारखी.शेपूट आखूड.खवले मऊ.पोटाकडील भाग पिवळसर पांढरा.वरील ओठांच्या खालील बाजूस दातांसारख्या रचनेचे खवले.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 1.5 फुट.

**प्रजनन:-** ***जारज.***मादी 3 ते 5 पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-** छोटे मासे, मऊ खवल्यांचे खेकडे,गोगलगाय इत्यादी पाण्यातील भक्ष.

**वस्तीस्थान:-** खाडी व लगतच्या खारपुटी जंगलामध्ये,नदीच्या मखा जवळ.

**परिशिष्ट:-** IV

**वैशिष्ट्ये:-** निशाचर.क्वचित प्रसंगी दिवसाही आढळतो.झिलान हा साप नदीच्या मुखा जवळ,खारफुटी जंगले,खाडी जवळ राहत असल्याने मनुष्य वस्तीत बहुदा सापडत नाही.मऊ खवल्यांच्या खेकड्यांच्या बिळाजवळ हमखास सापडतो.स्वभावाने शांत व लाजाळू असल्याने डिवचला गेला असता आपले तोंड शरीरा खाली लपवतो.समुद्र किनाऱ्या वर वाळू खाली लपतो.पाण्यातील वाळूच्या रंगात एकरूप होतो त्यामुळे मासे व इतर भाक्षांना सहजरीत्या चकवा देऊन पकडतो. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# हरणटोळ
# Green Vine Snake







आतील बाजूस असलेले विषदंत



# हरणटोळ
# Green Vine Snake



**शास्त्रीय नाव :-** *Ahaetulla Nasuta* **कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** ***निमविषरी***. रंग हिरवा.शरीराच्या दोन्ही कडेला पांढरी पिवळी पट्टी असते. डोके निमुळते व नाक टोकदार असते.डोळे सोनेरी व डोळ्यातील बाहुली आडवी.डोके निमुळते असल्यामुळे याला द्विनेत्री ***दृष्टी*** मिळते.एखाद्या वेलीप्रमाणे दिसतो म्हणून याला *वेल्या* साप असेही म्हणतात

**लांबी**:- सरासरी 3 फुट आणि अधिकतम 6 फुट.

**प्रजनन**:- मादी जुलै ते ऑगस्ट दरम्यान 10 ते 25 *पिल्लांना जन्म* देते.

**खाद्य**:- पाल, सरडा, बेडूक, छोटे पक्षी ,पक्षांची अंडी.

**वस्तीस्थान**:- जंगलातील झाडावर ,क्वचित वेळेस नदीकाठी.

**परिशिष्ठ:-** **IV**

**वैशिष्ठ्ये:-**दिवसा व रात्रीही शिकार करतो.डिवचला गेल्यास मान फुगवून शरीरा वरील काळे पांढरे पट्टे दाखवतो. या सापाचे अन्न जरी पाल, सरडे, इत्यादी असले तरी हा साप क्वचित वेळेस खापरखवल्या साप खातो.पण या सापाने नानेटी साप खाल्ल्याचे उदाहरण नुकतेच कोल्हापुरातील राधानगरी अभयारण्यत पाहायला मिळाले आहे .इंग्रजी मध्ये या सापाला VINE स्नेक म्हणतात आणि VINE म्हणजेच वेल.याचे तोंड टोकदार असल्यामुळे याला दाट झाडीतून मार्ग काढणे सोपे होते.निमुळत्या डोक्यामुळे याला ३३० दृष्टी प्राप्त होते.हरणटोळ हा भारतातील एकमेव साप आहे ज्याच्या डोळ्याची बाहुली अडवी असते.

# तपकिरी हरणटोळ
# Brown Vine Snake



**शास्त्रीय नाव :-** *Ahaetulla Pulverulenta*

**कुळ:-** *colubridae*

**वर्णन:-** ***निमविषारी.*** नावाप्रमाणे रंग तपकिरी किंवा गडद राखाडी तपकिरी. डोक्यावर तपकिरी रेषा.पाठीवर षटकोनी खुणा.हिरव्या हरणटोळच्या तुलनेत याचे तोंड लांब व चपटे असते.सडपातळ शरीर.लांब व निमुळती शेपूट.

**लांबी:-** सरासरी 4 फुट.अधिकतम 5.5 फुट.

**प्रजनन:-** ***जारज.*** ऑगस्ट-सप्टेंबर दरम्यान मादी 5 ते 10 पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-** उंदीर,झाडावरील पाल,सरडे,छोटे पक्षी इत्यादी.

**वस्तीस्थान:-** पश्चिम घाटातील जंगलात झाडा झुडूपामध्ये

**परिशिष्ट:-** IV

**वैशिष्ट्ये :-** दिनचर तसेच निशाचर.हिरवा हरणटोळ व या हरणटोळ सापामध्ये बरेच साम्य आहे.रंगातील फरकामुळे हे दोन्ही साप वेगवेगळे असल्याचे लक्षात येते.झाडाच्या खोडावर हा साप बसल्यास पटकन दिसून येत नाही.प्रामुख्याने झाडावर राहणारा हा साप त्याच्या सडपातळ व लांबलचक शरीरामुळे अतिशय चपळाईने भाक्षाचा पाठलाग करून त्यास पकडतो.प्रामुख्याने झाडाच्या वाळलेल्या फांदीवर जाऊन एकरूप होतो. त्यामुळे भक्षाला सहज चकवा देतो. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# पट्टेरी रेती सर्प

# Condanarus Sand Snake



**शास्त्रीय नाव :-** *Psammophis Condanarus*

**कुळ :-** *Lamprophiidae*

**वर्णन:-** निमविषारी.फिकट तपकिरी शरीरावर पाच समांतर रेषा.मधील रेषा गडद तपकिरी.त्याच्या बाजूच्या रेषा फिकट तपकिरी.त्या नंतरच्या रेषा गडद तपकिरी.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकात 3.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी अंडी घालते.

**खाद्य:-** बेडूक,पाल,सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** खडकाळ प्रदेश व खुरटी जंगले.

**परिशिष्ट :-** **IV**

**वैशिष्ट्ये :-**दिनचर.हा साप चपळ असून झाडावरही उत्तमरीत्या चढू शकतो.शिकार करताना डोके वर उचलून चपळतेने भक्षाचा पाठलाग करतो. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# जाड रेती सर्प
# Stout sand snake



**शास्त्रीय नाव :-** *Psammophis Longifrons*

**कुळ:-** *Lamprophiidae*

**वर्णन:-** **निमविषारी.** शरीर तपकिरी,माने कडील भाग राखाडी.खवल्यांची किनार काळी.पोटाकडील भाग पिवळसर पांढरा.खवले गुळगुळीत.डोळे मोठे व डोळ्यातील बाहुली गोल.

**लांबी:-** सरासरी 3 फुट.अधिकतम 4 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी ७ ते 8 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे,सापसुरळी क्वचित प्रसंगी उंदीर.

**वस्तीस्थान:-** जमिनीवर तसेच झाडावरही.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर.स्वभाव काहीसा चिडखोर असला तरी सहसा चावत नाही.नाव जरी रेती सर्प असले तरी रेती मध्ये सापडत नाही.दिसायला धामण या बिनविषारी सापासारखा दिसतो.निमविषारी असला तरी याच्या चाव्याने माणूस मरत नाही. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# लिथीचा रेती सर्प
# Leith's Sand Snake



**शास्त्रीय नाव :-** ***Psammophis Leithii***

**कुळ:-*****Lamprophiidae***

**वर्णन:-** *निमविषरी.*पिवळट मातकट रंगाच्या शरीरावर डोक्यापासून शेपटी पर्यंत चार गडद तपकिरी रंगाच्या रेषा.डोके माने पेक्षा थोडे मोठे.डोक्यावर लांबट गडद रंगाचे निशाण.तोंड लांबट असून डोळे मोठे व त्यात गोल बाहुली.गुळगुळीत खवले.शेपूट लांब.

**लांबी:-** सरासरी 2.5 फुट.अधिकतम 3.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज.***मादी मार्च ते जून दरम्यान 5 ते 11 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे छोटे पक्षी इत्यादी.

**वस्तीस्थान:-** दलदलीचा प्रदेश,रेताड प्रदेश,कुरणे इत्यादी.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-**दिनचर.जमिनीवर वावरणारा हा साप झाडावरही आढळतो.दिसायला पट्टेरी रेती सर्पासारखा. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# मांजऱ्या साप
# Common Cat Snake



**शास्त्रीय नाव :-** *Boiga Trigonata*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** *निमविषरी.*फिकट तपकिरी शरीरावर काळया पांढऱ्या नागमोडी खुणा.पोट पिवळट बदामी त्यावर छोटे ठिपके.डोक्यावर पांढऱ्या रंगामध्ये इग्रजीतील 'Y' या अक्षरासारखी खुण.लांब सडपातळ शरीर.शेपूट निमुळती व बारीक.आखूड त्रिकोणी डोके.डोळे मोठे व डोळ्यातील बाहुली उभी.डोळ्याच्या मागे वरील बाजूस पांढऱ्या रेषा.डोळे मांजरा प्रमाणे.

**लांबी:-** सरासरी 2.5 फुट.अधिकतम 4.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज.***मादी मार्च ते मे दरम्यान 5 ते 10 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे छोटे,पक्षी इत्यादी.

**वस्तीस्थान:-** शहर,खेडी,जंगल,भातशेती खडकाळ प्रदेश,झाडीझुडूपात.

**परिशिष्ठ:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर परंतु दिवसाही आढळतो.डिवचला गेला असता तोंड उघडून स्प्रिंग सारखा हल्ला करतो.शेपूट जोरात हलवून चेतावणी देतो.प्रामुख्याने झाडावर आढळतो.लांब निमुळत्या शेपटीचा उपयोग फांदीला लटकून भक्ष पकडण्यासाठी करतो. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# सिलोन मांजऱ्या साप
## Ceylon Cat Snake



**शास्त्रीय नाव :-** *Boiga Ceylonensis*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-**निमविषारी.राखाडी तपकिरी शिरीर,त्यावर गडद तपकिरी ठिपके आणि रेषा.डोळे मोठे.डोळ्यात उभी बाहुली.डोळ्या मागे काळी रेष.शरीर चपटे व लांब.बारीक व निमुळते शेपूट.

**लांबी:-** सरासरी 3 फुट.अधिकतम 4.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज.***मादी 5 ते 10 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे,झाडावरील बेडूक.

**वस्तीस्थान:-** घनदाट जंगले.पश्चिम घाटातील व पूर्व घाटातील दाट जंगलात.

**परिशिष्ठ:-** IV

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.डोळयातील उभ्या बाहुली मुळे कमी प्रकाशात वावरतो.या सापाचे नाव श्रीलंका या देशावरून पडले आहे.हा साप श्रीलंकेतही सापडतो.शरीर सडपातळ आणि शेपूट लांब व बारीक असल्याने झाडावर चांगल्या प्रकारे वावरतो. डिवचला गेल्यास वेटोळे घालून बसतो व शेपटी हलवून चेतावणी देतो.तोंड उघडून हल्ला करतो.झाडाच्या ढोलीत अंडी देतो.याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# बेडोमचा मांजऱ्या साप
# Beddome's Cat Snake



**शास्त्रीय नाव :-** *Boiga Beddomei*

**कुळ:-***Colubridae*

**वर्णन:-** *निमविषारी*.तपकिरी किंवा फिकट राखाडी शरीर.शरीरावर काळी नागमोडी नक्षी.डोक्यावर काळे गडद तपकिरी ठिपके.डोक्याच्या मागे तिरकस रेष.पोट पिवळसर पांढरे.त्यावर काळसर ठिपके.शरीर उभे चपटे.डोके मानेपेक्षा मोठे व थोडेसे त्रिकोणी.शरीर सडपातळ.लांब व बारीक शेपूट.खवले मऊ.

**लांबी:-** सरासरी 2.5 फुट.अधिकतम 4 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी मार्च-एप्रिल दरम्यान 5 ते 8 अंडी घालते.

**खाद्य:-** झाडावरील जंगली पाल,सरडे,बेडूक इत्यादी.

**वस्तीस्थान:-** दाट जंगलात उंच झाडावर.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.डोळ्यातील उभ्या बाहुली मुळे रात्री जास्त वावरतो.रात्री शिकार करणे पसंत करतो.सडपातळ शरीर व बारीक शेपटीचा वापर झाडावरील भक्ष पकडण्यासाठी करतो.डिवचला गेल्यास वेटोळे घालून बसतो व शेपटी हलवून चेतावणी देतो.झाडाच्या ढोलीत अंडी देतो. याचे विष भक्षाला जरी अपायकारक असले तरी माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो. दिसायला हुबेहूब सिलोन मांजऱ्या सापा सारखा.

# फोर्स्टैन मांजऱ्या साप
# Forsten's Cat Snake





# फोर्स्टेन मांजऱ्या साप
# Forsten's Cat Snake



**शास्त्रीय नाव :-** *Boiga forsteni*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-** *निमविषरी*.शरीर तपकिरी किंवा राखाडी.शरीरावर एक आड एक चौकोनी नक्षी.डोक्यावर गडद तपकिरी किंवा काळी रेष.डोळ्यामागे काळी रेष.डोळे मोठे व डोळ्यात उभी बाहुली.डोके मोठे व त्रिकोणी.

**लांबी:-** सरासरी 5.5 फुट.अधिकतम 7.5 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.मार्च ते मे दरम्यान मादी 5 ते 12 आणि घालते.

**खाद्य:-** झाडावरील पाल,सरडे,बेडूक,छोटे पक्षी.

**वस्तीस्थान:-** जंगलातील झाडाची फांदी,ढोली, तर जमिनीवर पालापाचोळयात.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.भक्षाच्या शोधात दिवसा जमिनीवर दिसतो.रात्री झाडावरील भक्ष पकडणे पसंत करतो.महाराष्ट्रात सापडणाऱ्या मांजऱ्या या प्रजातीतील सर्वात मोठा व लांब साप.डिवचला गेल्यास काहीसा फुत्कारतो व हल्ला करतो.हा साप निमविषारी असला तरी याचे विष भक्षाला अपायकारक असते.माणसाच्या जीवाला याच्या पासून कसलाच धोका नसतो.

# उडता सोनसर्प
# Ornate Flying snake



**शास्त्रीय नाव :-** *chrysopelea ornata*

**कुळ:-** *Colubridae*

**वर्णन:-***निमविषरी.*शरीराचा रंग पिवळा,फिकट पिवळा, हिरवट पिवळा.शरीरावर काळ्या फुल्या व केशरी ठिपके.डोळे मोठे व गोल बाहुली.शरीर निमुळते,डोके निमुळते.खवले मऊ.डोक्यावर तोंडाच्या टोका पासून माने पर्यंत फिकट पिवळे पट्टे व त्यामध्ये फिकट लाल फुल्या.

**लांबी:-** सरासरी 3.5 फुट.अधिकतम 6 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज.***जून जुलै दरम्यान मादी 6 ते 12 अंडी घालते.

**खाद्य:-** पाल,सरडे,बेडूक व छोटे पक्षी.

**वस्तीस्थान:-** प्रामुख्याने जंगलातील झाडावर राहतो.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर.प्रामुख्याने झाडावर राहणारा हा साप एका झाडावरून दुसऱ्या झाडावर अलगद तरंगत जाऊ शकतो.म्हणूनच याला उडता सोनसर्प म्हणतात.पण हा हवेत उडत नसून तरंगतो.एका झाडावरून दुसऱ्या झाडावर जाताना हा आपले शरीर चपटे करतो व प्याराशुट सारखा तरंगत जातो.हा एका झाडावरून दुसऱ्या झाडावर १०० मीटर पर्यंत हवेत अलगद उडत(तरंगत) जाऊ शकतो.

# भारतीय अंडीखाऊ साप
# Indian Egg Eater snake







# भारतीय अंडीखाऊ साप
# Indian Egg Eater snake



**शास्त्रीय नाव :-** *Elachistodon westermanni*

**कुळ:-** ***Colubridae (dasypeltidae)***

**वर्णन:-** *निमविषारी*.शरीराचा रंग तपकिरी.शरीराच्या समोरील भागात गडद तपकिरी,फिकट पिवळसर धब्बे.पोटाकडचा भाग पिवळसर व त्यावर काळसर ठिपके.डोळे मोठे व डोळयांमध्ये उभी बाहुली.मानेपासून शेपटी पर्यंत पिवळी रेष.

**लांबी:-** सरासरी 1.5 फुट.अधिकतम 2.5 फुट.

**प्रजनन:-** अंडज.मादी 5 ते 8 अंडी घालते.

**खाद्य:-** मुख्यतः लहान पक्षांची अंडी,पाल सरडे इत्यादी.

**वस्तीस्थान:-** जमिनीवर व झाडावर.

**परिशिष्ट:-** **I**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर परंतु दिवसही दिसतो.हा साप नामशेष झाल्याचा समाज होता पण २००५ साली अमरावती व त्या नंतरच्या काळात वर्धा,यवतमाळ,जळगाव इत्यादी ठिकाणी त्याची नोंद झाली.हा साप काहीसा तस्कर सापासारखा दिसतो.याचे आवडते खाद्य अंडी असून अंडे गिळल्यावर त्याच्या माने जवळ असणाऱ्या पात्यासारख्या मणक्यांनी ते अंडे फोडतो व त्यातील तरल पदार्थ गिळतो.राहिलेले अंड्याचे कवच मात्र तोंडावाटे बाहेर काढतो.हा साप अतिशय दुर्मिळ असल्याने त्याला वाघ किंवा हरणा इतके संरक्षण वन्यजीव कायद्या अंतर्गत मिळाले आहे.

# श्वानमुखी सर्प
# Dog Faced Water snake



**शास्त्रीय नाव :-** *Cerberus rynchops*

**कुळ:-** *Homalopsidae*

**वर्णन:-***निमविषारी*.गडद राखाडी रंगाचे शरीर.शरीरावर काळे धब्बे.पोटाकडील खवले पांढरे व त्यावर गडद तपकिरी धब्बे.डोके आखूड व डोक्याच्या बाजूला गडद रेषा.डोळे लहान व डोक्याच्या वरच्या बाजूला.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकतम 4.5 फुट

**प्रजनन:-** जारज.मादी फेब्रुवारी ते मे दरम्यान 10 ते 30 पिल्ले देते.

**खाद्य:-** समुद्रकिनाऱ्यावरील मासे बेडूक खेकडे आदी.

**वस्तीस्थान:-** समुद्रकिनाऱ्या लगत असणाऱ्या खेकड्यांच्या बिळात.

**परिशिष्ट:-** II

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.पाण्यात उत्तम रित्या पोहू शकत असल्याने मासे व खेकड्यांचा पाठलाग करून त्यांना पकडतो.खेकडे पकडणाऱ्या लोकांना सर्रास सापडतो.शरीर जाडजूड व घोणस सापासारखे असल्याने याला विषारी समजून मारले जाते.या सापाचे तोंड कुत्र्या प्रमाणे दिसते म्हणून याला श्वानमुखी किंवा इंग्रजी मध्ये डॉग फेस्ड असे म्हणतात.लुप्त होत चाललेला हा साप वन्यजीव कायद्या अंतर्गत परिशिष्ट दोन मध्ये समाविष्ट करण्यात आले आहे.

# भारतीय चष्मेधारी नाग
# Indian Spectacled Cobra



**शास्त्रीय नाव :-** *Naja naja*

**कुळ:-** *Elapidae*

**वर्णन:-** ***विषारी***.शरीराचा रंग तपकिरी,राखाडी,पिवळसर गव्हाळ.डोक्याचा भाग मोठा.डोळे मोठे व बाहुली गोल.फण्याच्या मागे काळ्या रंगात चष्मा आकृती किंवा मोडी लिपीतील दहाचा आकडा.काही नागांच्या फण्यावरील आकृतीचा आकार वेगवेळा तर काहींमध्ये नसतोच.खवले गुळगुळीत.फण्याच्या समोरील बाजूस दोन काळे मोठे ठिपके दिसतात.

**लांबी:-** सरासरी 3.5 फुट.अधिकतम ७ फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.एप्रिल मे दरम्यान मादी 10 ते 15 अंडी घालते.सुमारे ५० ते ७० दिवसांनी अंड्यातून पिल्ले बाहेर पडतात.

**खाद्य:-** उंदीर,बेडूक,सरडे व अन्य साप.

**वस्तीस्थान**:- उंदरांची बिळे,दगड विटांचा ढीग,जंगल,भातशेती व पडकी घरे,शहर व ग्रामीण भागात आढळतो.

**परिशिष्ट:-** **II**

# भारतीय चष्मेधारी नाग
# Indian Spectacled Cobra



**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.डिवचला गेला असता फणा काढतो.फणा काढत असल्यामुळे इतर सापांपेक्षा भयावह व सुंदर दिसतो.हिंदू लोक याला नाग देव असे म्हणतात.सापातील सर्वात लोकप्रिय साप.नागाच्या फण्यावर दोन डोळ्यासारखे मोठे ठिपके असतात त्यामुळे पाठीमागून हल्ला करणाऱ्या शत्रूला डोळ्यांचा भास होतो व शत्रू पळून जातो. बाकी विषारी सापांच्या तुलनेत नागाच्या दंशाने लवकर मृत्यू ओढवतो.नाग हा साप मनुष्य वस्तीमधेही सापडत असल्याने याच्या बद्दल अनेक गैरसमज पसरले आहेत आणि यातूनच या सापाची हत्या केली जाते.म्हणूनच वन्यजीव कायद्या अंतर्गत या सापाला परिशिष्ठ दोन मध्ये समाविष्ट करण्यात आले आहे.

**नाग सापाच्या दंशाची लक्षणे**

नागाचे विष माणसाच्या मज्जासंस्थेवर परिणाम करते.

1)दंश झालेल्या जागी वेदना आणि जळजळ होउन त्या जागेवर सूज येते.

2)अंग जड झाल्यासारखे वाटते.

3)डोळ्यांवर झापड येते.डोळे झाकायला लागतात.दोन दोन प्रतिमा दिसू लागतात.

4)मळमळून उलट्या व्हायला लागतात.

5)जिभ जड होऊन तोंडातून लाळ गळू लागते.

6)घाम फुटतो,श्वास घेणे कठीण होते.

7)हृदयाचे ठोके वाढतात.

8)उपचारा आभावी मृत्यू ओढवतो.

# नागराज

# King Cobra



**शास्त्रीय नाव :-** ***Ophiophagus hannah***

**कुळ:-** ***Elapidae***

**वर्णन:-** विषारी.शरीराचा रंग पिवळसर शेवाळी,राखाडी हिरवट.त्यावर पिवळसर पांढरे आडवे पट्टे.पोटाकडील बाजू फिकट तपकिरी.शरीर लांब व जाड.डोळे मध्यम व बाहुली गोल.फणा नागापेक्षा उभा,लांबट पण कमी पसरट.

**लांबी:-** सरासरी 10 फुट.अधिकतम 18 फुट.

**प्रजनन:-** ***अंडज***.एप्रिल मे दरम्यान मादी १५ ते ५० अंडी घालते व साधारणतः ६० दिवसांनी पिल्ले बाहेर पडतात.

**खाद्य:-** इतर साप.धामण साप आवडते खाद्य.क्वचित प्रसंगी बेडूक व उंदीर.

**वस्तीस्थान:-** घनदाट वर्षा वनात,बांबू च्या वनात,चहाच्या मळ्यात व डोंगर उतारावर.

**परिशिष्ठ:-** **II**



# नागराज
# King Cobra



**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.जगातील विषारी सापातील सर्वात लांब साप. लाजाळू.डिवचला असता जोरात फुत्कारतो.फणा काढून 4 ते 5 फुट उंच उभा राहतो. जानेवारी ते मार्च या काळात उष्णता जास्त असल्याने मिलन काळासाठी योग्य. अंडी घालण्या आधी मादी आसपासचा पाला पाचोळा शेपूट व शरीराच्या साह्याने गोळा करून घरटे बनवते व त्यात अंडी देते.पिल्ले बाहेर पडेपर्यंत मादी उपवाशी राहून अंड्यांचे रक्षण करते.काहीवेळेस नर नागराज सापही अंड्याचे रक्षण करत असल्याचे आढळून आले आहे.हा साप जगातील सर्वात बुद्धिमान साप मानला जातो.मादी इतर नराच्या संपर्कात आल्यास नर नागराज त्या मादीस मारून टाकतो.(काहीसे मानवी प्रवृत्तीचे लक्षणं.असो.)नागापेक्षा विषाची तीव्रता कमी,पण प्रमाण जास्त असल्याने घातक.

नागराजाला लॅटिन भाषेमध्ये ***ophiophagus*** म्हणजेच साप खाणारा साप म्हणतात.

## नागराज सापाच्या दंशाची लक्षणे.

1)दंश झालेल्या जागी वेदना आणि जळजळ होउन त्या जागेवर सूज येते.

2)अंग जड झाल्यासारखे वाटते.

3)डोळ्यांवर झापड येते.डोळे झाकायला लागतात.दोन दोन प्रतिमा दिसू लागतात.

4)मळमळून उलट्या व्हायला लागतात.

5)जिभ जड होऊन तोंडातून लाळ गळू लागते.

6)घाम फुटतो,श्वास घेणे कठीण होते.

7)हृदयाचे ठोके वाढतात.

8)उपचारा आभावी मृत्यू होतो.

# मण्यार
# Common Krait



**शास्त्रीय नाव :-** ***Bungarus caeruleus***

**कुळ:-** ***Elapidae***

**वर्णन:-**विषारी.शरीराचा रंग काळा किंवा गडद तपकिरी.त्यावर पांढऱ्या ठिपक्यांच्या जोड्यांचे पट्टे.ओठ पोटाकडील भाग पांढरा.डोळे बारीक व काळे.पाठीवरच्या मधल्या रांगेतील खवले षटकोनी व मोठे.खवले गुळगुळीत व चमकदार.शेपूट आखूड.

**लांबी:-** सरासरी 3 फुट.अधिकतम 5.5 फुट.

**प्रजनन:-** अंडज.मार्च ते मे दरम्यान मादी ७ ते 12 अंडी घालते.

**खाद्य:-** कवड्या हा बिनविषारी साप,पाल,सरडे,उंदीर इत्यादी.

**वस्तीस्थान:-** उंदरांची बिळे,शेत,दगड विटांचा ढीग.

**परिशिष्ट:-** **IV**

# मण्यार
# Common Krait



**वैशिष्ट्ये :-** निशाचर.लाजाळू.हा साप अतिविषारी आहे.बिनविषारी कवड्या हा साप पालीच्या शोधात आपल्या घराजवळ येतो आणि मण्यार या सापाचे आवडते खाद्य कवड्या साप असल्याने मण्यार हा साप आपल्या घराच्या आसपास येतो. दिसायला काळाभोर असल्यामुळे अंधारात लवकर दिसून येत नाही.रात्री शिकारीसाठी बाहेर पडत असल्याने मण्यार सापाचा दंश रात्रीच जास्त होतो.याचे विषदांत लहान असल्याने आणि दंशानंतर कसलीच वेदना होत नसल्याने झोपेत चावलेले कळत नाही.

## मण्यार सापाच्या दंशाची लक्षणे

मण्यार सापाचे विष नागाप्रमाणेच मज्जासंस्थेवर परिणाम करते.

1)मण्यार साप दंश केलेल्या जागी वेदना होत नाहीत अथवा सूज येत नाही.त्यामुळे झोपेत अथवा सतर्क नसतेवेळी या सापाने दंश केलेला समजून येत नाही.

2)सुरुवातीला लक्षणे दिसून येत नाहीत पण काही तासांनी लक्षणे दिसू लागतात व झपाट्याने वाढतात.

3)काही वेळाने पोटात व सांध्यात दुखू लागते व असाह्य वेदना होऊ लागतात.

4)काही वेळेस पाठीचा कणाही दुखतो.

5)उपचारा आभावी श्वसनक्रिया निकामी झाल्याने मृत्यू ओढवतो.

# वॉल्स सिंध मण्यार
# Wall's sindh Krait



**शास्त्रीय नाव :-** *Bungarus sindanus walli*

**कुळ:-** *Elapidae*

**वर्णन:-** विषारी.शरीराचा रंग गडद काळा,निळसर किंवा गडद तपकिरी.शेपटी पासून डोक्यापर्यंत छोट्या पांढऱ्या ठिपक्यांचे पट्टे.हे ठिपके डोक्याकडे पुसट होत जातात.तोंडाकडील भाग पिवळा.खवले मऊ व चकचकीत.पाठीच्या मध्यातून गेलेल्या खवल्यांचा आकार षटकोनी.डोळे बारीक व काळे.

**लांबी:-** सरासरी 3 फुट.अधिकतम 5.5 फुट.

**प्रजनन:-** अंडज.मादी मार्च ते मे दरम्यान 5 ते ७ अंडी घालते.

**खाद्य:-** उंदीर,पाल,सरडे व कवड्या साप.

**वस्तीस्थान:-** ओसाड तसेच खडकाळ प्रदेश,पडक्या घरात,खेड्यात,शहरात इ.

**परिशिष्ट:-** IV

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.मण्यार च्या तुलनेत अतिशय रंगीत.दिसायला काळाभोर असल्यामुळे अंधारात लवकर दिसून येत नाही.रात्री शिकारीसाठी बाहेर पडत असल्याने मण्यार सापाचा दंश रात्रीच जास्त होतो.याचे विषदांत लहान असल्याने आणि दंशानंतर कसलीच वेदना होत नसल्याने झोपेत चावलेले कळत नाही.

# पट्टेरी मण्यार
# Banded Krait



**शास्त्रीय नाव :-** *Bungarus fasciatus*

**कुळ:-** *Elapidae*

**वर्णन:-** विषारी.शरीर त्रिकोणी त्यावर काळे व पिवळे पट्टे.पोटाकडील भाग पुसट दिसतो.बोथट गोलाकार शेपूट.डोक्यावर इंग्रजी **'V'** या अक्षरा सारखी खुण.खवले चमकदार व मऊ.डोळे बारीक व काळे.

**लांबी:-** सरासरी 4 फुट.अधिकतम ७ फुट.

**प्रजनन:-** अंडज.मादी मार्च एप्रिल दरम्यान 5 ते १४ अंडी घालते.

**खाद्य:-** इतर साप,उंदीर,पाल व क्वचित प्रसंगी बेडूक.

**वस्तीस्थान:-** दमट जंगले,खेडी,खडकाळ प्रदेश

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.स्वभावाने शांत व लाजाळू असल्यमुळे क्वचितच हल्ला करतो.शरीरावरील काळ्या-पिवळ्या पट्ट्यांमुळे पालापाचोळयात लगेच एकरूप होतो.महाराष्ट्रात सापडणाऱ्या मण्यार सापाच्या प्रजातीतील सर्वात लांब साप.विदर्भात याला आग्या मण्यार असे म्हणतात.

# पोवळा
# Slender Coral Snake



**शास्त्रीय नाव :-** *Calliophis melanurus.*

**कुळ:-** *Elapidae*

**वर्णन:-** ***विषारी.***शरीराचा रंग तपकिरी.डोके काळे.शेपटीवर दोन काळे आडवे पट्टे.शेपटी खाली निळा रंग.पोटाकडील भाग पोवळ्यासारखा नारंगी-लाल.लांब सडपातळ शरीर.डोळे लहान व काळे.खवले मऊ.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 1 फुट 2 इंच.

**प्रजनन:-** ***अंडज***.मादी 2 ते ७ अंडी घालते.

**खाद्य:-** छोटे कीटक,वाळा साप.

**वस्तीस्थान:-** जमिनीत,दगड विटांच्या ढिगाखाली,पालापाचोळयात.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर पण दिवसाही आढळतो.विषारी सापातील सर्वात लहान साप. दुर्मिळ असल्याने क्वचितच आढळतो.डिवचला गेला असता शेपटी गोल करून शेपटी खालील लाल-नारंगी रंग प्रदर्शित करून चेतावणी देतो.दिसायला हुबेहूब काळ तोंड्या सापासारखा दिसतो.या सापाचे विषदांत खूपच लहान असल्याने माणसाच्या रट्ट कातडी मध्ये घुसत नाहीत आणि म्हणूनच या सापाच्या दंशाचे प्रमाण नगण्य आहे.

# पट्टेरी पोवळा
# Striped Coral Snake



**शास्त्रीय नाव :-** *Calliophis nigrescens*

**कुळ:-** *Elapidae*

**वर्णन:-** ***विषारी***.शरीराच्या रंग गडद तपकिरी,लालसर काळा.त्यावर 3 ते 5 उभ्या काळ्या रेषा.गडद काळ्या रंगाच्या सापावर या रेषा पुसट व अस्पष्ट दिसतात.डोके काळे व डोळ्यामागे फिकट काळा आडवा पट्टा.पोटाकडील भाग लालसर नारंगी.शरीर लांब व सडपातळ.शेपटी आखूड.शेपटीच्या खालचे खवले काहीसे पांढरे दातेरी आकाराचे.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकतम 4 फुट.

**प्रजनन:-** अंडज.मादी 3 ते 6 अंडी घालते.

**खाद्य:-** छोटे कीटक,पालीचे पिल्लु व छोट्या आकाराचे साप.

**वस्तीस्थान:-** पालापाचोळयात राहणारा हा साप भक्षाचा पाठलाग करते वेळेस झाडावरही चढतो.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.डिवचला असता शेपूट गोल करून शेपटीच्या खालील नारंगी रंग प्रदर्शित करतो.पोवळा सापापेक्षा पट्टेरी पोवळा लांब व जाड असतो.

# घोणस

# Russell's Viper





# घोणस
# Russell's Viper



**शास्त्रीय नाव :-** *Daboia russelii*

**कुळ:-** *Viperidae*

**वर्णन:-** ***विषारी***.शरीराचा रंग तपकिरी,पिवळसर तपकिरी किंवा गडद तपकिरी.त्यावर पांढरी किनार असलेल्या गडद तपकिरी गोल ठिपक्यांच्या टीन रांगा.शरीराच्या खालील भाग पिवळसर पांढरा.स्थूल गोलाकार शरीर.डोके चपटे-त्रिकोणी व शेपूट आखूड.डोळे मोठे व डोळ्यातील बाहुली उभी.

**लांबी:-** सरासरी 3.5 फुट.अधिकतम 6 फुट.

**प्रजनन:-** ***जारज***.मे ते जुलै दरम्यान मादी 10 ते ७० पिल्ले देते.अधिकतम ११५ पिल्ले दिल्याची नोंद.

**खाद्य:-** उंदीर,बेडूक,घूस व इतर लहान सस्तन प्राणी.

**वस्तीस्थान:-** उसाच्या शेतात राहणे पसंत करतो.उंदरांच्या बिळात,गवताळ भागात,धान्याच्या गोदामात व जंगलात.

**परिशिष्ट:-** II

# घोणस
# Russell's Viper



**वैशिष्ट्ये :-** निशाचर पण भक्षाच्या शोधात दिवसही आढळतो.शरीराचा रंग व त्यावरील नक्षीमुळे पालापाचोळयात एकरूप होतो.चिडल्यानंतर कुकरच्या शिट्टी सारखा आवाज काढून चेतावणी देतो.स्वभावाने अतिशय चिडखोर असणारा हा साप वेटोळे घालून स्प्रिंग प्रमाणे अचानक हल्ला करतो.जमिनी लगत एका सेकंदाला 8 फुट लांब पर्यंत येऊन हल्ला करतो.आकाराने जरी जाडजूड व स्थूल वाटत असला तरी अतिशय चपळतेने हल्ला करतो.जमिनीवर चपळ असतो.पाण्यात उत्तमरीत्या पोहू शकतो.घोणस हा साप अजगरासारखा दिसतो.पण अजगर बिनविषारी असतो.डिसेंबर ते मार्च हा प्रणयकाळ असल्याने शेतातील घोणस रात्रीच्यावेळेस विहिरीत व शेत तळयात पडतात.शेतात व मनुष्य वस्तीजवळ आढळत असल्याने याची निर्घृणपणे हत्या केली जाते.आणि म्हणूनच या सापाला वन्यजीव कायद्या अंतर्गत परिशिष्ठ 2 मध्ये समाविष्ट करण्यात आला आहे.या सापाच्या विषाचा वापर रक्तदाब,मधुमेह व अन्य रक्तासंबंधी आजारांच्या औषधामध्ये केला जातो.

## घोणस सापाच्या दंशाची लक्षणे.

घोणस सापाच्या विषाचा परिणाम रक्त व रक्ताभिसरण संस्थेवर होतो

1)दंश झालेल्या ठिकाणी तीव्र व असाह्य वेदना होऊन या वेदना व सूज अवयवभर पसरते.

2)दंशाच्या ठिकाणी फोड येतात व ती जागा काळी निळी होऊन त्यातून रक्त किंवा काळसर पाणी येते.आंतरिक रक्तस्त्राव होतो. नाडीचे ठोके अनियमित होतात.

3)कित्येकदा नका,तोंडावाटे,लाघवी वाटे रक्त येते.त्यामुळे अशक्तपणा जाणवतो.

4)उपचारा अभावी यकृत निकामे होऊन मृत्यू होतो.

# फुरसे

# Saw Scaled Viper



**शास्त्रीय नाव :-** *Echis carinatus*

**कुळ:-** **Viperidae**

**वर्णन:-** विषारी.शरीराचा रंग तपकरी.त्यावर पांढरी जाळीदार नक्षी.मानेपासून शेपटी पर्यंत पाठीच्या मध्यभागी तपकिरी पांढरे ठिपके.डोके काहीसे त्रिकोणी,डोक्यावर पांढरी किंवा फिकट तपकिरी बाणाकृती खुण.डोळे मोठे व सोनेरी.डोळ्यातील बाहुली उभी व काळी.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकतम 2 फुट.

**प्रजनन:-** ***जारज*** .मादी एप्रिल ते ऑगस्ट दरम्यान 5 ते १७ पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-** विंचू,पाल,सरडे,छोटे बेडूक,उंदीर इत्यादी.

**वस्तीस्थान:-** दगडाखाली,खडकाळ जमिनीवर,काटेरी वनात,भातशेती.

**परिशिष्ट:-** **IV**

# फुरसे
# Saw Scaled Viper



**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.या सापाचे खवले करवतीच्या दात्याप्रमाणे खरखरीत असतात.डिवचला असता हे खवले एकमेकांवर घासून करवतीसारखा आवाज काढून चेतावणी देतो.भारतात सापडणाऱ्या व्हायपर कुळातील सर्वात लहान व विषारी साप. आवडते खाद्य विंचू असून बऱ्याचदा विंचू खाताना फुरसे या सापाला विंचवाच्या दंशाचा सामना करावा लागतो.पण विंचवाचे विष पचवण्याची शक्ती त्याच्या शरीरात असते.विंचवाची संख्या कमी होत असल्यामुळे फुरसे या सापाची संख्या घटत आहे. कोकणात विंचवांची संख्या जास्त असल्याने तेथे फुरसे हा साप जास्त प्रमाणत आढळतो.लहान मुले क्रिकेट खेळण्यासाठी स्टंप म्हणून मैदानातील दगड गोळा करतेवेळेस दगडाखाली बसलेल्या फुरसे या सापाने अनेकदा दंश केल्याच्या घटना घडतात.इंग्रजी मध्ये SAW म्हणजे करवत आणि या सापाचे खवले करवती सारखे असल्याने या सापाला **Saw Scaled** असे म्हणतात.

## फुरसे या सापाच्या दंशाची लक्षणे

1)दंश झालेल्या ठिकाणी तीव्र व असाह्य वेदना होऊन या वेदना व सूज अवयवभर पसरते.

2)रक्ताच्या गुठळ्या तयार होतात.

3)कित्येकदा नका,तोंडावाटे,लाघवी वाटे रक्त येते.त्यामुळे अशक्तपणा जाणवतो.

4)उपचारा अभावी मृत्यू होतो.

# चापडा

# Bamboo Pit Viper



**शास्त्रीय नाव :-** *Trimeresurus gramineus*

**कुळ :-** **Viperidae**

**वर्णन:-** ***विषारी***.शरीराचा रंग हिरवे,पिवळसर,निळसर शेवाळी.शरीरावर काळे किंवा तपकिरी ठिपके.पोटाकडी भाग पिवळसर बदामी.डोके चपटे व त्रिकोणी.ओठ पिवळसर.शेवाळी रंगाचे डोळे.त्यात उभी बाहुली.डोळे व नाकपुड्यांच्या मध्ये उष्मसंवेदनग्राहक खाचा.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकतम 4 फुट.

**प्रजनन:-** जारज.मादी मे ते जुलै दरम्यान 5 ते १५ पिल्ले देते.

**खाद्य:-** पाल,सरडे,उंदीर व इतर सस्तन प्राणी.

**वस्तीस्थान:-** जंगलातील झाडावर.

**परिशिष्ट:-** **IV**



# चापडा
# Bamboo Pit Viper



**वैशिष्ट्ये :-** निशाचर.डिवचला असता शेपटी जोराने हलवून चावण्या आधी चेतावणी देतो.तोंड उघडून हल्ला करतो.शेपटीचा उपयोग फांदीला लटकून भक्ष पकडण्यासाठी करतो.झाडावरील बेडूक व पालींना आकर्षित करण्यासाठी शेपटी एखाद्या अळी प्रमाणे हलवतो व जवळ आल्यास त्यांना पकडतो.या सापाला डोळे व नाकाच्या मध्ये उष्मसंवेदनग्राहक खाचा असतात ज्याचा उपयोग रात्रीच्या अंधारात भक्ष पकडण्यासाठी होतो.या खाचांद्वारे भक्षाच्या शरीरातील उष्णता या सापाला जाणवते आणि त्यामुळेच काळोखातही याला अचूकपणे भक्षाची शिकार करता येते.हा साप घनदाट जंगलात राहत असल्याने याच्या दंशाचे प्रमाण खूपच कमी आहे.त्यातही या सापाच्या विषाची तीव्रता कमी असते.

**चापडा या सापाच्या दंशाची लक्षणे**

दंशाची जागा लाल होऊन वेदना होऊ लागतात.ह्या वेदना अवयवभर पसरतात.रक्त पातळ होऊन उशिरा गोठते.

योग्यवेळी उपचार न झाल्यास मृत्यू होतो.



# मलबार चापडा

# Malabar Pit Viper







# मलबार चापडा
# Malabar Pit Viper



**शास्त्रीय नाव :-** *Trimeresurus malabaricus*

**कुळ:-** *Viperidae*

**वर्णन:-** विषारी.मलबार चापडा निळसर हिरव्या,राखाडी-तपकिरी,नारंगी-लाल अश्या वेग वेगळ्या रंगात सापडतो.शरीरावर तपकिरी-फिकट तपकिरी रंगाचे धब्बे.चपटे,त्रिकोणी डोके.डोळ्यात उभी बाहुली.डोळे व नाकपुड्यांच्या मध्ये उष्मसंवेदनग्राहक खाचा.

**लांबी:-** सरासरी 2 फुट.अधिकतम 3.5 फुट.

**प्रजनन:-** जारज.मादी 8 ते 12 पिल्लांना जन्म देते.

**खाद्य:-** झाडावरील पाल,सरडे,बेडूक.

**वस्तीस्थान:-** जंगलातील झाडावर,झाडाच्या ढोलीत काही वेळेस जमिनीवरील भक्ष पकडण्यासाठी जमिनीवर येतो.

**परिशिष्ट:-** IV

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.मलबार चापडा हा साप सामान्य चापड्याच्या कुळातील असून दोन्ही सापांमध्ये बरेचसे साम्य आहे.त्यांची जीवन शैली,भक्ष पकडण्याची पद्धत सारखीच आहे.या सापाच्या दंशाची लक्षणं चापडा या सापासारखीच असतात.

# नाकाड्या चापडा
# Hump Nosed Pit Viper



**शास्त्रीय नाव :-** *Hypnale hypnale*

**कुळ:-** **Viperidae**

**वर्णन:-** विषारी.तपकिरी रंगाचे शरीर.त्यावर गडद तपकिरी किंवा फिकट काळे आडवे पट्टे.डोके त्रिकोणी टोकदार व नाकाचे टोक वर वळलेले.शेपूट पिवळसर लाल.

**लांबी:-** सरासरी 1 फुट.अधिकतम 2 फुट.

**प्रजनन:-** जारज.मादी सप्टेंबर-ऑक्टोबर दरम्यान 5 ते 10 पिल्ले देते.

**खाद्य:-** पाल,सरडे व इतर झाडावरील छोटे प्राणी.

**वस्तीस्थान:-** दाट जंगलातील झाडांवर.दिवसा पालापाचोळयात.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** निशाचर.काही वेळेस भक्ष पकडण्यासाठी दिवसा पालापाचोळयात लपतो.झाडावर असताना शेपूट अळीसारखी हलवून पाल,बेडूक,सरडे यांना आकर्षित करतो.या सापाच्या नाकाच्या आकारामुळे याचे नाव नाकाड्या चापडा असे पडले.या सापाचा दंश अतिशय दाहक व वेदनादायी असून इतर चापडा सापांच्या तुलनेत याचे विष अधिक घातक असल्याचे समोर आले आहे.पण सुदैवाने हा साप दाट जंगलात राहत असून  मानवी वस्तीमध्ये क्वचितच आढळतो.

# समुद्र सर्प
# Hook Nosed Sea snake



**शास्त्रीय नाव :-** *Enhydrina schistosa*

**कुळ:-** **Hydrophiidae**

**वर्णन:-** ***विषारी***.राखाडी,हिरवट शेवाळी रंगाच्या शरीरावर गडद हिरवे पट्टे.डोके व मान समान जाडीचे.जबड्याच्या वरील भाग खालील भागापेक्षा मोठा.डोळे मध्यम व डोळयांमध्ये मोत्यासारखी गोल बाहुली.नाकपुड्या इतर सापांच्या नाकपुड्या पेक्षा मोठ्या.शेपूट वल्ह्यासारखी चपटी.

**लांबी:-** सरासरी 2.5 फुट.अधिकतम 4.5 फुट.

**प्रजनन:-** जारज.मादी फेब्रुवारी ते जून दरम्यान 5 ते ३५ पिल्लांना जन्म देते.समुद्री मण्यार या सापाची मादी जमिनीवर 5 ते 10 अंडी देते.

**खाद्य:-** मासे व समुद्रातील अन्य छोटे जीव.

**वस्तीस्थान:-** प्रामुख्याने समुद्रात.काही वेळेस खाडीत सापडतो.

**परिशिष्ट:-** **IV**

**वैशिष्ट्ये :-** दिनचर व निशाचर.शेपूट वाल्ह्यासारखे चपटे असल्याने पाण्यात पोहताना दिशा बदलण्यासाठी उपयुक्त ठरते.जीभेखालील ग्रंथी शरीरात जाणाऱ्या मीठयुक्त पाण्याचे फिल्टर करून मीठ जमा करते आणि ते मीठ शरीराबाहेर परत समुद्रात सोडले जाते.हा साप ४० मिनिट ते 2 तासापर्यंत पाण्यात राहू शकतो.समुद्रसाप जमिनीवरील सापांपेक्षा जास्त विषारी आहे.

## ❑साप घरात का येतो :-

1. अस्वच्छता व अडगळी मूळे उंदीर येतात आणि त्यांच्या मागे साप येतात.
2. शिल्लक अन्न (खरकटे) घराजवळ टाकल्यामूळे उंदीर येतात आणि त्यांच्या मागे साप येतात.
3. उंदरांनी केलेली बिळ,जुने वस्तू जसे की - टायर,विटांचा ढीग,लाकडाचे ओंडके, पाईप इ.






## ❑साप घरात येऊ नये म्हणून काय करावे :-

1. परिसर स्वच्छ ठेवणे.
2. घरामध्ये उंदीर येतील असे काही करू नये.
3. शिल्लक राहिलेले अन्न कचरा कुंडीत टाकावे.
4. घराच्या दरवाज्यात किंवा खिडकीतून येणारी फांदी तोडावी ( झाड बिलकुल तोडू नये ).
5. साप लपतील अशी ठिकाणे नष्ट करावीत.

## ❑ ***साप घरात आल्यास काय करावे :-***

1. सापाला न मारता अनुभवी व जाणकार सर्पमित्राला बोलवावे.
2. सापावर तीक्ष्ण नजर ठेवावी,जेणे करून सर्पमित्राला साप लवकर सापडेल.
3. घरातील लहान मुलांना व वृध्द व्यक्तींना सुरक्षित स्थळी पोहोचवावे.
4. ज्या ठिकाणी साप गेला आहे त्या ठिकाणी मुबलक प्रकाशाची व्यवस्था करावी.
5. टॉर्च सर्वांना सापडावी अशा ठिकाणी ठेवावी.
6. जर सर्पमित्र आलेच नाही तर, मोठी काठी किंवा बांबू घ्यावा. त्याला समोर छोटीशी तार बांधून आकडा तयार करावा.व त्या सापास आकड्याने पकडून अलगद परिसरापासून लांब सोडावे.
7. साप छोटा आहे म्हणून त्याला डीवचू नये.असे केल्यास जीवावर बेतू शकते.



## ❑ ***सर्पदंश कसे टाळावे :-***

1 झाडाझुडपातून व जंगलातून चालताना पायात बुट व डोक्यावर टोपी असावी.

2 रात्रीच्या वेळी बाहेर वावरताना हातात टॉर्च व काठी ठेवावी. काठी जमिनीवर आपटत चालावे.

3 रात्रीच्या वेळेस जमिनीवर झोपणे टाळावे शक्यतो पलंगावर झोपावे.

4 शेतात कापणीच्या वेळी जास्त सतर्क राहावे जमल्यास बूट घालून काम करावे.

5 अडचणीत व अडगळीत हात घालताना आत काही नाही याची खात्री करूनच हात घालावे.





## ❑ ***सर्पदंश झाल्यास काय करावे :-***

1. सर्पदंश झालेल्या व्यक्तीस मानसिक आधार द्यावा व लवकरात लवकर सरकारी दवाखान्यात घेऊन जावे.
2. सर्पदंश झालेली जखम स्वच्छ पाण्याने धुवून घ्यावी.
3. खाली दाखविल्याप्रमाने आवळपट्टी बांधणे.
4. आवळपट्टी बांधताना Crape Bandage,फुट पट्टी कापडाच्या तुकड्यांच्या वापर करावा. दोरी,सुतळी किंवा पतंगीचा मांजा वापरू नये.
5. आवळपट्टी बांधताना चित्रात दाखवल्या प्रमाणे बांधावे. दर 10 मिनिटांनी आवळपट्टी 1 मिनिटांसाठी काढावी व परत बांधावी, असे केल्याने रक्त प्रवाह मंद होईल बंद होणार नाही.
6. आवळपट्टी काही न वापरता फक्त कापडाने जर खच्चून बांधली तर रक्त प्रवाह बंद होऊन सर्पदंश झालेला अवयव निकामी होण्याची शक्यता असते.
7. साप विषारी होता कि बिनविषारी हे ओळखण्यासाठी सर्पदंश झालेल्या व्यक्तीस कडू निम्बाचा पाला,मिरची खाऊ घालतात जे पूर्णपणे चुकीचे आहे.अश्या पदार्थांमुळे उलट्या व तोंडाची जळजळ होते जे शरीरासाठी अपायकारक ठरते.

# सर्पदंश प्रथमोपचार

1



2



3



4



5





**हाताला  दंश झाल्यास वर दाखवल्या प्रमाणेच हाताला आवळ पट्टी (क्रेप बँडेज) बांधावी.**

टिप:-हे प्रथमोपचार घोणस व फुरसे चावल्यास करू नयेत.

# शरीरावरील सर्पदंश




# सर्पदंशाची वेळ












## विषारी सर्पदंशाची सामान्य लक्षणे

1)दंश झालेल्या जागेवर सूज येणे,वेदना होणे.

2)दंश झालेला भाग काळसर होऊन जखमेतून लालसर पाणी येणे.

3)घाम फुटणे अशक्तपणा जाणवणे,तोंडातून लाळ गळणे,जीभ जड होणे.उलटी होणे.

4)डोळ्याच्या पापण्या जड होणे,अस्पष्ट दिसणे.

5)श्वास घेण्यास त्रास होणे,गिळताना त्रास होणे.

6)तोंडावाटे,नाकावाटे,लघवीतून रक्त येणे.

7)पोटात सांध्यात तीव्र वेदना होणे.

## जनावरातील सर्पदंशाची लक्षणे

1)विषारी सापाने दंश केल्यास जनावर अस्वस्थ होऊन सैरावैरा पळू लागते.

2)सर्पदंशाच्या जागी सूज येते.तोंडातून लाळ गळू लागते.

3)असाह्य वेदनेने जनावर डोके आपटू लागते.

4)विषाचा परिणाम वाढल्यास चारा खाणे बंद करते.

5)अशक्तपणा मुळे जनावर मान टाकते.त्याला उभे राहणे कठीण होते.

6)श्वासोच्छवास अनियमित होतो.

7)लघवीचा रंग लाल होत जातो.लघवी जितकी लाल तितके विष जनावराच्या शरीरात भिनलेले असते.

## प्रथमोपचार

सर्पदंशाची लक्षणं दिसून आल्यास जनावरास शांत करावे.त्याची हालचाल कमी करण्याचा प्रयत्न करावा.दंश झालेल्या ठिकाणी आवळपट्टी बांधावी.पशुवैद्याला घटनास्थळी बोलवावे अथवा जनावरास न चालवता वाहनातून दवाखान्यात घेऊन जावे.

# गैरसमज व स्पष्टीकरण

## 1. साप दूध पितो.

**स्पष्टीकरण :-** कोणताच साप दूध पित नाही. साप मांसाहारी असून तो फक्त जीवंत प्राणीच खातों.दूध हे सस्तन प्राण्याचे अन्न आहे.

## 2. साप पुंगीच्या तालावर नाचतो.

**स्पष्टीकरण :-** सापाला कान नसतात.त्यामुळे सापाला ऐकू येत नाही.साप पुंगीच्या हालचाली वर नाचतो.

## 3. एक साप मारल्यास दुसरा साप येऊन बदला घेतो.

**स्पष्टीकरण :-** साप कधीही बदला घेत नाही.सापाची स्मरणशक्ती कमी असल्याने त्याला काहीही लक्षात राहात नसते.





**4. नागाच्या डोक्यावर नागमणी असतो.**

**स्पष्टीकरण :-** कोणत्याही सापाच्या डोक्यात नागमणी नसतो. नागमणी म्हणून जे गारुड़ी दाखवतात ते benzene चे खड़े असतात.

**5. साप धनाचे रक्षण करतो.**

**स्पष्टीकरण :-** कोणताही साप धनाचे रक्षण करत नाही. या निव्वळ दंत कथा आहेत

**6. साप फुंकल्यावर माणूस सुजतो.**

**स्पष्टीकरण :-** हे साफ खोटे आहे.कोणताही साप फुंकल्यावर माणूस सुजत नाही.

**7. साप शिट्टी वाजवल्यावर घरात येतो.**

**स्पष्टीकरण :-** सापाला कान नसतात त्यामुळे शिट्टी वाजवल्यावर घरात येत नाही.

**8. धामन चाडी गाठ मारते व माणसाला मारून टाकते.**

**स्पष्टीकरण :-** धामन आधार मिळण्यासाठी गाठ मारते. पण तिच्या गाठ मारण्याने माणूस मरत नाही.



**9.धामनच्या शेपटीला काटा असतो व ती पुरुषाना तो काटा मारून नपुंसक करते.**

**स्पष्टीकरण :-** धामनच्या शेपटीला काटा नसतो.शेपटी निमूळती व टोकदार असल्याने शेपटीला काटा असल्यासारखे वाटते.

**10.साप उल्टा झाल्यावरच विष चढते.**

**स्पष्टीकरण :-** सापांचे दात आतील बाजूस वळलेले असतात.काही वेळा सापाचे दात चावल्यानंतर आडकतात.ते सोडवण्यासाठी साप उल्टा होतो.विषारी साप उल्टा जरी न होता चावला तरी विष चढते.

**11.दरवाज्यावर आस्तिक मुनिची शपथ लिहिल्याने साप घरात येत नाही.**

**स्पष्टीकरण :-** सापाला वाचता येत नसल्याने काहीही लिहिले तरी साप घरात येऊ शकतो.






**12.हरणटोळ साप माणसाचे डोके फोड़तो.**

**स्पष्टीकरण :-** माणसाचे डोके खुप टणक असते त्यामुळे कोणताही साप ते फोडू शकत नाही.

**13.सापाच्या अंगावर केस असतात.**

**स्पष्टीकरण :-** सापाच्या अंगावर केस नसतात.कधी कधी साप कात टाकताना आपल्याला सापाच्या अंगावर केस असल्याचा भास होतो.

**14.मांडुळ सापाला दोन तोंड असतात व तो सहा महिने एका बाजूने व सहा महीने दुसऱ्या बाजूने चालतो.शरीरात विद्युत प्रवाह असतो.**

**स्पष्टीकरण :-** मांडुळ सापाला एकच तोंड असते.त्याची शेपटी आखूड़ असल्याने दोन्हीकडे तोंड असल्यासारखे वाटते.त्याच्या शरीरात कसलाही विद्युत प्रवाह नसतो.

**15.तंत्र मंत्राने विष उतरते.**

**स्पष्टीकरण :-** तंत्र मंत्राने कधीही विष उतरत नाही.दवाखान्यात (ASV) प्रतीविष दिल्यानेच विष उतरते.

**16.इच्छाधारी नाग किंवा नागीण असते.**

**स्पष्टीकरण :-** इच्छाधारी नाग किंवा नागीण बिलकुल नसते.ही निव्वळ अंधश्रद्धा आहे.

**17.धामण हा साप गायी म्हशींच्या पायाला विळखा घालून दूध पितो.**

**स्पष्टीकरण :-**कोणत्याही सापाचे अन्न दुध नाही.त्यामुळे धामणच काय दुसरा कोणताही साप दुध पीत नाही.



## संकलपना , डिझाईन, माहिती विश्लेषण:-

राहुल शिंदे

## छायाचित्रण श्रेय :-

अनिल काणसकर

विवेक शर्मा

रवी पवार

विशाल पाटील

हेमंत तोडकर

संदीप पाटील

चिरंजीव सुतार

## मुखपृष्ठ डिझाईन:-

युवराज शिंदे

## पब्लिशिंग सपोर्ट :-

प्रसाद शिंदे (अध्यक्ष Helping Hands wildlife welfare society )

**Reference:-**

साप (निलीमकुमार खैरे ), सापांची अद्भुत दुनिया (ज्ञानेश्वर म्हात्रे ) व अन्य शोध निबंध.

अधिक माहिती साठी संपर्क राहुल शिंदे :-9860093712